# प्रस्थान

[लघुकथासंग्रह]

वामन चोरघडे




* २९ *

मूल्य दोन रुपये




## शुभास्ते पन्थानः

श्री. वामनराव चोरघडे ह्यांच्या कथांनीं मला विलक्षण ओढ लावलेली आहे. ही ओढ कां लागली हें मात्र मला पूर्णपणें सांगतां येणार नाहीं. प्रत्येक गोष्टीची संपूर्ण कारणमीमांसा करतां आली तर जीवनाला रहस्यच उरणार नाहीं; आणि रहस्यहीन जीवनांत मजा तरी काय ? जीवनाचा प्रत्येक कोपरान् कोपरा प्रकाशानें उजळतां आला तर प्रकाशाचें आजचें आकर्षण तरी टिकून राहील काय ?

अर्थात् वामनरावांच्या कथांबद्दल मला जें आकर्षण वाटतें त्याचीं एक दोन कारणें मी सांगूं शकेन. हीं कारणें मूलग्राही न ठरतां कदाचित् नुसतीं निदर्शक ठरतील. पहिलें महत्त्वाचें कारण म्हणजे ह्या कथांचें काव्य. लघुकथा ही काव्याला जवळ आहे, कीं नाट्याला नजीक आहे असा एक वाद समीक्षावाङ्मयांत आढळून येतो. त्यांतलें सत्य मला असें दिसतें, कीं दोनहि प्रकारच्या लघुकथा असूं शकतात. जीवनांतलें काव्य आणि जीवनांतला संगर, ह्या दोनहि गोष्टींनीं लघुकथा-लेखकाला प्रेरणा मिळालेली आहे. मला स्वतःला मात्र काव्यमय कथा अधिक आवडतात. ही निर्भेळ आस्वादाची वृत्ति आहे, कीं जीवन-कलहाच्या ज्वाळांपासून दूर पळण्याची वृत्ति आहे, कीं पहिली वृत्ति दुसरींतून निर्माण झालेली आहे, हें मला नीटसें सांगतां येणार नाहीं. कदाचित दुसरीच पहिलीचा परिणाम असेल ! तें कांहींहि असलें तरी मी स्वतः काव्यमय कथांचा भोक्ता आहें आणि नेमकें ह्या गोष्टीमुळेंच मला चोरघड्यांच्या कथांचें वेड आहे.

हें वेड मात्र भाग्यशील नाहीं. किंबहुना माझी स्वतःची काव्यलोलुप वृत्तिच भाग्यशील नाहीं. [ ज्या वयांत जीवनांतल्या आणि

वाङ्मयांतल्या काव्याचा मनमुराद आस्वाद घ्यावयाचा त्या वयांत मी मार्क्सच्या विरोधविकासवादाचा आणि अवशिष्ट मूल्याचा घिसाडी खटाटोप करीत होतों ! ] चोरघड्यांच्या कथांविषयींचें माझें वेड भाग्यशाली नाहीं असें मीं म्हटलें ह्याचें कारण हें, कीं ह्या कथांशीं माझा जो पहिला परिचय झाला तो त्यांचीं मुद्रितें तपासतांना. एकाद्या पुस्तकाचीं मुद्रितें तपासणें म्हणजे त्याचें कायमचें शत्रुत्वच पत्करणें होय. पण इतकें दुर्भाग्य मात्र माझ्या वांट्याला आलें नाहीं. थोड्याच दिवसांत चोरघड्यांच्या स्नेहाचा लाभ मला झाला आणि ह्या स्नेहदीपाच्या सौम्य, शांत आणि शोधक प्रकाशांत त्यांच्या कथागुणांचा साक्षात्कार मला होऊं शकला. अशा प्रकारें ह्या कथांचें कायमचें शत्रुत्व जरी मी करून बसलों नाहीं, तरी त्यांच्याबद्दल एक प्रकारची अढी माझ्या मनांत बसलेली असावी व म्हणूनच बहुधा माझ्या अर्पणपत्रिकांवरील लेखांत (प्रतिभा-विशेषांक, १९३७) चोरघड्यांचा 'सुषमा' हा कथासंग्रह 'झाडांच्या सावल्यांस' अर्पण केलेला आहे ह्या गोष्टीची थट्टा करण्यास मी उद्युक्त झालों.

झाडांच्या गूढ, तरल सावल्यांस आपला कथासंग्रह अर्पण करण्यांत वामनरावांची जी काव्यवृत्ति व्यक्त झाली तिनेंच अखेरीस मला खेचून घेतलें. त्यांच्या कथांतल्या काव्यानेंच मला आस लावली. काव्य म्हणजे अर्थात् नुसती कल्पकता नव्हे, निव्वळ कल्पनाविलास नव्हे, केवळ उपमा-उत्प्रेक्षकांची पखरण नव्हे. भावच्छटांनीं आपलें सारें लेखन, आपली जीवनाभिव्यक्ति रंगवून काढण्याची जी वृत्ति तिलाच खरोखर अभिजात काव्यवृत्ति म्हणतां येईल. ह्या वृत्तीमुळें उपमाउत्प्रेक्षांचा गालिचा विणतां आला तरी तें कांहीं तिचें वैशिष्ट्य नव्हे, ह्या उपमाउत्प्रेक्षांचें सौंदर्य हें खरोखर, भावगतीनें ओढल्या

जाणाऱ्या इंजिनांतून आसमंतांत उडणाऱ्या अग्निकणिकांचें सौंदर्य असतें. अशा अग्निकणिका वामनरावांच्या कथांत सर्वत्र विखुरलेल्या आढळतील. प्रस्तुत ‘ प्रस्थान ’ ह्या, त्यांच्या इतर कथासंग्रहांच्या मानानें कमी काव्यमय असलेल्या, कथासंग्रहांतहि उपमाउत्प्रेक्षांचा आढळ सर्वत्र होतो. ‘ म्हातारा जोंवर खंबीर होता, तोंवर घरचें वातावरण पूर्णपणें शांत होतें—अगदीं वाळूसारखें ! दगड टाकला तरी उत्तर यायचें नाहीं, प्रतिध्वनि उमटायचा नाहीं. ’ [ पृ. ४६ ], ‘ हजारों सुरकुत्या त्या चेहेऱ्यावर पडल्या होत्या. आम्हा तीन भावंडां-पायीं त्यांना ज्या खस्ता खाव्या लागल्या होत्या त्यांची एकेक खूण म्हणून एकेक सुरकुती त्यांच्या चेहेऱ्यावर उमटली होती. ’ [ पृ. ८७–८८ ], ‘ तें दुःखाचें रडणें नव्हतेंच. तसलें दुःख सुख देणारेंच असतें. त्या ऊन पाण्यानें जीवनाचे फुलबाग फुलतात. मृगाच्या पहिल्या पावसानें कदंबाचीं झाडें जशीं बहरतात तसेंच, तसेंच ! ’ [ पृ. ९० ], ‘ हा रोगी कुडी तशीच टाकून जाणार ह्याबद्दल त्याची खात्री होती. आशेचा अंधुक आसराहि तेल संपलेल्या दिव्याच्या ज्योतीसारखा निराशा पोटांत घेतघेत नाहींसा होत होता. ’ [ पृ. ९८–९९ ], ‘ हातांतली चिमणी भुर्कन उडाली म्हणजे ती ज्या दिशेनें उडाली तिकडे पाहात बसण्यापलीकडे दुसरें कांहीं न न करतां येणाऱ्या असहाय जीवाप्रमाणें त्याची मनःस्थिति झालेली होती.’ [ पृ. २६ ]–अशा संस्मरणीय उपमा–उत्प्रेक्षा–कल्पना तुम्हांला ह्या संग्रहांत पानोपानीं भेटतील. काव्यमय उपमा–उत्प्रेक्षांप्रमाणें काव्यमय वर्णनेंहि ह्या संग्रहांत भरपूर आहेत. ‘ सौंदर्याचें सुख ’ ह्या कथेंतलें नीलकंठ पक्ष्याचें वर्णन [ ‘ तो मधूनच उडून गेला म्हणजे त्याच्या पंखांच्या पोटचा गाभा कसा मखमलीसारखा दिसे. निळ्या

मखमलींत शुभ्र पिसांचे पराग ब्रह्मदेवासारख्या कलावंतानें स्वतःच्या निर्मितीचा विलास म्हणून कौशल्यानें बसविले होते ' वगैरे ] तर एकाद्या कल्पनाप्रचुर संस्कृत काव्यांत शोभून जाईल असें आहे. अशा वर्णनांचा प्रतीकात्मक उपयोग करण्याची चातुरीहि ' अमरवेल '-सारख्या कथांत आढळून येते. वामनरावांच्या ह्या काव्यामागची शक्ति ही बौद्धिक भरारीची शक्ति नसून भावनेची शक्ति आहे. त्यांतलें सौंदर्य हें अखेरीस भावसौंदर्य आहे. भावनांच्या कारंज्यांवरच त्यांच्या कल्पकतेचीं हीं इंद्रफुलें फुललेलीं आहेत. ह्या भावसामर्थ्यामुळेंच ते आपलें कल्पनाशील गद्य लिहूं शकतात. अशा भावसाक्षात्कारी कल्पनाशील गद्यामुळेंच त्यांच्या ' अग्निदिव्य ' ह्या कथेला [ कथेला म्हणण्यापेक्षां लेखाला म्हणणें अधिक योग्य होईल ] एक प्रकारचें आर्त लालित्य प्राप्त झालें आहे. कारावासांतले भावबंध ह्या लेखांत-अर्थात् लालित्याच्या मर्यादा न सोडतां---मुक्त झाले आहेत असें आढळून येईल.

ह्या ' अग्निदिव्या ' मुळेंच - ह्या संग्रहाच्या सुरवातीसच-चोर-घड्यांच्या कलेबद्दल एक नवीन जाणीव होते. ती ही, कीं चोरघड्यांची कला एका अग्निदिव्यांतून जात आहे, तिचा आतां कायाकल्प होत आहे. तिचें पूर्वीचें रूप, पूर्वीचा रंग, सुगंध ह्यांवर नवीन कळा येत आहे. त्यांच्या ' सुषमें 'तलें काव्य हें परिस्तानांतलें काव्य होतें. त्याची तऱ्हा निराळी होती. त्याची अनुभूति वेगळी होती. उदबत्तीच्या धुराचीं नाजुक तरल वलयें वातावरणांत विलीन होतात तशी ही अनुभूति आपल्या व्यक्तित्वांत विलीन होत आहे असें वाचकाला वाटे. 'सुषमें'तल्या कथांचें प्रतिबिंब स्वच्छ सुंदर पाण्यांतल्या, पक्ष्याच्या उडत्या प्रतिबिंबासारखें असे. त्या वेळीं चोरघड्यांची प्रतिभा फुलपांखराच्या

पंखांवर स्वार होई आणि परिस्तानांतल्या प्रदेशांत लीलेनें संचार करून येई. त्यांच्या ह्या परिस्तानांतल्या पऱ्या उषेच्या नेत्रांनीं पाहात आणि निर्झराच्या रवानें हसत. ' संथ निळसर पाण्यावर उठणाऱ्या विलोल वलयांसारखे ' त्यांच्या मुद्रेवर भाव उठत आणि नाहींसे होत. ' प्रियकरांच्या केसांवर आणि पापण्यांवर फुंकर घालणें ' ही त्यांची आवडती प्रणयक्रीडा होती. त्यांच्या नासिकांतून पारिजातकांचा सुगंध वाहात असे आणि ह्या सुगंधानें वेडे झालेले त्यांचे प्रियकर, प्राणांतिक कर्तव्यास जातांना, ' ती जाईची वेल आहे ना ? तिला रोज पाणी घालीत जा. जोंपर्यंत ती हिरवी राहील तोंपर्यंत मी जिवंत आहें हें निश्चित. तिला फुलें आलीं, कीं समजून जा, कीं मी सुखांत आहें आणि आनंदांत हसतों आहें. ' असें आपल्या प्रणयिनींना आश्वासून सांगत. ह्या वाङ्मयांत लोकवाङ्मयाचें सौन्दर्य आहे हें सहज ध्यानांत येईल. वामनराव चोरघडे हे लोकवाङ्मयाचे उपासकच नव्हत तर लेखक आहेत हा केवळ योगायोग नव्हे; तें त्यांच्या प्रकृतींत आहे.

लोकवाङ्मय हें जसें समाजाच्या कोवळ्या [ immature ] वृत्तीचें निदर्शक असतें तशी सुषमा ही चोरघड्यांच्या कोवळ्या वृत्तीची निदर्शक म्हटली तरी चालेल. [ त्यांची कला कोवळी होती असें मात्र मला म्हणायचें नाहीं. ] कोवळ्या प्रेमाचीं ( calf-love ) सुंदर चित्रें ह्या कथासंग्रहांत आढळतात. [ उदाहरणार्थ, ' कांचेची किमया ', ' आणभाक '. ] कोवळे विचारहि क्वचित् आढळतील. कोवळ्या लुसलुशीत भावनांची शिंपण तर पानापानावर आहे. ह्या भावनांत बेभान रंगून जायची वृत्ति कित्येकांना जरा विचित्र वाटली. म्हणूनच, मला वाटतें, माझे मित्र श्री. निशिकांत खानोलकर ह्यांनीं चोरघड्यांच्या

कलेवर ' भावविवश आत्मसंभोगा 'चा आरोप केला. हा आरोप विदारक वाटला तरी चोरघड्यांची कला तो नाकारीत नाहीं. तसें पाहिलें तर प्रत्येक कलाकृति ही एक प्रकारें कलात्मक आत्मसंभोगच असते. [ मी आत्मप्रीति हा शब्द वापरीन. ] कलावन्त हाच खरा प्रेमवीर असतो आणि त्याच्या स्वतःच्या भावना आणि विचार हें त्याच्या प्रेमाचें अधिष्ठान असतें. ह्यांतूनच त्याच्या प्रतिभेला पालवी फुटते, त्याची कला जन्माला येते. पण चोरघड्यांची ' सुषमा ' ह्या आरोपाला निर्देशपूर्वक पात्र झाली ह्याचें कारण त्यांच्या कलात्मक प्रेमाचें अधिष्ठान बनलेल्या त्यांच्या भावना कोवळ्या वाटल्या असाव्यात. अर्थात् ह्या भावना सजीव व सत्य होत्या ह्याबद्दल कधींच शंका नव्हती. तें कांहींहि असलें तरी आज त्यांच्या कलेचा कायाकल्प होत आहे. सुषमेच्या काळांत वामनरावांची स्थिति चांदणें प्यालेल्या चकोरासारखी होती, तर आज त्यांना जीवन प्यालेल्या ज्ञानपक्ष्याची विदग्धता प्राप्त झालेली दिसते ! आकाशाच्या नीलिम्यांत लेखणी बुडवून त्या वेळीं चोरघडे लिहीत – आज त्यांच्या लेखणीला, क्षणांत दाही दिशा उजळून टाकणाऱ्या सौदामिनीची दीप्ति प्राप्त होत आहे. ' सुषमे 'तल्या शैशवस्मृतींशीं ह्या संग्रहांतल्या सकस ' शैशवस्मृती 'ची तुलना केल्याबरोबर हें पटेल.

आतां, ही सौदामिनी चोरघड्यांच्या कलावृक्षावरच कोसळेल किंवा काय अशी शंका येणें साहजिक आहे. स्वतः चोरघड्यांनींच अशीच कांहींशी शंका ' प्रस्थान 'च्या ' आरंभीं ' व्यक्त केली आहे. त्यांच्या ' अग्निदिव्या 'सारख्या आजच्या कल्पनाशील लिखाणाकडे पाहिलें तर अशा शंकेला अवसर राहाण्याचें कारण नाहीं. पण त्याचबरोबर चोरघड्यांच्या कथा, अधिकाधिक प्रमाणांत, ललितनिबंधांचें स्वरूप

धारण करतील असें वाटल्यावांचून राहात नाहीं. पूर्वी, 'सुषमा-यौवन'च्या कालांत, कथालेखनाला उद्युक्त झालेले चोरघडे कथेऐवजीं गद्यकाव्य लिहून मोकळे होत [ येथें त्यांचीं 'मीलन' सारखीं गद्यकाव्यें आठवतील. ] आतां कदाचित् त्यांच्या कथोत्सुक लेखणींतून ललितनिबंध उतरतील ! अर्थात् सौंदर्य आणि सामर्थ्य ह्यांचा आढळ त्यांत होईल अशी आशा करायला कांहींच हरकत नाहीं.

ऑगस्ट-आंदोलनांत वामनरावांना जो कारावास घडला त्यामुळें त्यांच्या कलेंत हा कायाकल्प होत आहे असें समजण्याचें मात्र कारण नाहीं. ज्या एका अंतःकरणाच्या प्रवृत्तीमुळें हा कायाकल्प शक्य झाला आहे तिचा विशेष विकास ह्या कारावासानें झाला असें फार तर म्हणावें. ही अंतःकरणाची प्रवृत्ति नवीन नाहीं. 'हवन'मध्यें तिचा साक्षात्कार पूर्वींच झाला होता. इतरहि कथांत तिचा आविष्कार थोडाबहुत होतोच. वस्तुस्थिति अशी आहे, कीं वामनराव चोरघड्यांच्या व्यक्तित्वांत दोन प्रवाह वाहात असतात. एक काव्याचा. ह्या प्रवाहांत प्रतिबिंबित झालेल्या सौंदर्याची दखल आपण घेतलीच आहे. वामनरावांच्या व्यक्तित्वांत दुसरी एक प्रवृत्ति आहे आणि ती दिवसेंदिवस, जीवनानुभवाच्या पोषणानें, प्रबल होत आहे. हिला मी जीवनार्थशोधक प्रवृत्ति म्हणतों. चोरघड्यांच्या कथांमध्यें मधून मधून जीवनावर भाष्य करणारा टीकाकार आणि विचाराचे स्रोत सोडून देणारा प्रचारक डोकावतो तो ह्या जीवनार्थशोधक वृत्तींतूनच जन्माला आला आहे.

ही जीवनार्थशोधक वृत्ति कलेला जाचक ठरलीच पाहिजे असें नाहीं. जीवनभाष्य अशी मुळीं कलेची व्याख्याच आहे. अंतःकरणाच्या प्रवृत्तींना वळण लावण्याचें थोर कार्य कांहीं टीकाकारांनीं कलावन्ताकडे सोपवलेलें

आहे. पण हें कार्य कलापूर्णतेनें व्हायचें असेल तर तें पद्धतशीर आणि मर्यादशील असलें पाहिजे. कला ही जीवनावरचें भाष्य ठरते, पण कशी? ती रसिकाच्या अनुभवभांडारांत एकाद्या नवीन अनुभवाची भर टाकते. ह्या अनुभवाच्या आंचेनें ती रसिकाच्या अंतःकरणांतली पूर्वीची अनुभवसंघटना [ अनुभवांची समधातता असें हवें तर म्हणा ] बदलून टाकते आणि अशा प्रकारें रसिकाला जीवनाबद्दलची नवी जाणीव, नवी दृष्टि देते. ह्या नव्या दृष्टीमुळें तो रसिक जीवनांत साहजिकच नवा अर्थ पाहूं लागतो – तो जीवनार्थ-संशोधक बनतो. कला जीवनावर भाष्य करते तें असें मर्यादशीलतेनें. वामनराव चोरघड्यांचाच एक आवडता इंग्रजी शब्द वापरून बोलायचें झालें तर तिच्या कार्यांत grace असते. ती प्रवचनें झोडीत नाहीं, मतप्रदर्शनाचाहि हव्यास धरीत नाहीं. ती एखादा नवा अर्थपूर्ण अनुभव देते आणि ह्यानेंच ती जीवनावरच्या भाष्याचें कार्य साधते.

कलेंतला अनुभव निव्वळ कपोलकल्पित असतो, त्याचा जीवनाशीं कांहीं संबंध नसतो असें सांगण्याचा येथें हेतु नाहीं. कलेंतला अनुभव हा जीवनाचाच एक तुकडा असतो, पण त्याला, कलात्मक स्वरूप देतांना, जीवनाच्या संदर्भांतून काढून घेतलेलें असतें. कला ही जीवनानुभवांतून जन्माला येते ह्याबद्दल वादच नाहीं, पण आपल्या अनुभवाचा एखादा ढुवा जीवनाच्या सांखळींतून अलग काढून त्याचा निरपेक्ष आस्वाद कलावन्त घेऊं लागतो तेव्हांच त्या अनुभवाला कलात्मक, सौंदर्यशाली स्वरूप प्राप्त होऊं लागतें. आपल्या नित्याच्या जीवनाला अनेक स्वार्थी, संकुचित, व्यावहारिक हेतु असतात. कलात्मक अनुभव अशा व्यावहारिक हेतूंपासून अलिप्त

असतो. ह्या अलिप्ततेंतूनच कलाकृतीला तिची grace प्राप्त होत असते.

ही grace वामनरावांची कला नेहमींच ओळखते असें मला म्हणवत नाहीं. ती अनेकदा नवा अनुभव देते, पण ह्या अनुभवाला अर्थदर्शनाचें अस्तर जोडण्यास ती आतुर असल्यानें अनेकदा तो अनुभव ठरावा तितका अर्थपूर्ण ठरत नाहीं. ह्या कथासंग्रहांत हा अनुभव मला तरी वारंवार आला. ‘ आजचें काम ’ ही कथाच, उदाहरणार्थ, पाहा. एका भिकाऱ्याच्या पोरीला एक मूल रस्त्यावर सांपडलें, दुःखाच्या सहवेदनेनें तिनें त्याला कडेवर घेतलें आणि आईची जागा भरून काढण्याचा प्रयत्न केला, हा साधा पण हृद्य अनुभव व्यक्त करतांना लेखकाला बंगालच्या दुष्काळाची आठवण तर झालीच आहे, पण समाजाच्या विपरीत नावीन्यप्रियतेबद्दल कींव व्यक्त करण्यासहि तो विसरलेला नाहीं. एवढ्यावरच थांबलें नाहीं. भिकाऱ्याच्या पोरीचा वरील अनुभव व्यक्त करण्यासाठीं लेखकानें ही कथा [वा शब्दचित्र] लिहिलेलीच नाहीं. “चैतन्यशील, डोळस यंत्राच्या साहाय्यानें विश्वव्यापी तारकशक्ति खास निर्माण करतां येईल. वात्सल्याचें पाणी व संकल्पाचा कोळसा घालून हृदयाची कळ फिरविली तर ह्या ‘ न भूतो न भविष्यति ’ अशा जगडव्याळ मानवी यंत्राचीं चाकें फिरूं लागतील ” अशी कल्पना ‘ मांडण्याची धृति ’ ह्या शब्दचित्राच्या निमित्तानें लेखकानें केली आहे. कलावन्ताचा मार्ग सोडून तत्त्वज्ञाच्या अगर शास्त्रज्ञाच्या प्रांतांत लेखकानें येथें पाऊल तर टाकलेंच आहे, पण त्यासाठीं त्यानें बुद्धिपुरस्सर निवेदकाची भूमिका पत्करली आहे. ही निवेदकाची भूमिका वामनराव वारंवार पत्करतात. आपल्या वाचकांचा विसर त्यांना क्वचितच पडतो. आतां निवेदन [ communication ] हा कलेचा एक महत्त्वपूर्ण

विशेष (डॉ. रिचर्ड्स् अगर प्रो. हुमायून कबीर ह्यांच्याप्रमाणें) मानला तरी, वाचकाचा विचार मनांत वागवून एखादा लेखक वाङ्मयनिर्मितीस सिद्ध झाला तर तें त्याच्या कलेला मारक झाल्याशिवाय राहाणार नाहीं हें रिचर्ड्स्नीं सुद्धा मान्य केलें आहे. § पुष्कळदा तर वामनराव निवेदकाची भूमिका स्वीकारूनहि थांबत नाहींत. ते वाचकाचीच भूमिका स्वीकारतात. वाचकानें मार्जिनमध्यें लिहावयाचे उद्गार ते स्वतःच आपल्या कथांत लिहून जातात. पृ. १०२–१०३ वर असे दोन उद्गार आढळतील. [ 'कोण कोणासाठीं रडतो!' 'वस्तु दुरूनच चांगल्या!' ]

वामनरावांच्या जीवनार्थशोधक वृत्तीमुळें त्यांच्या कलेंत अशीं किरकोळ वैगुण्यें आलीं असलीं तरी ह्या वृत्तीमुळेंच त्यांच्या लेखणीला एक धार प्राप्त झाली आहे. जीवनांतल्या उपरोधपूर्ण गोष्टी ते चटकन् टिपून घेतात. जीवनाचीं विलक्षण आणि विदारक सत्यें ते चटकन् लिहून जातात. हीं सत्यें अर्थात् नुसत्या तात्विक दृष्टिकोनानें साध्य झालेलीं नाहींत. जीवनाच्या प्रखर अनुभवामुळेंच तीं प्रतीत झालेलीं आहेत. जीवनाच्या संघर्षांत उडालेल्या त्या ठिणग्या आहेत. अशा ठिणग्या तुम्हांला ह्या संग्रहाच्या पानापानावर आढळतील. 'जीवनाची सावली ही अशी भुतासारखी भेडसावते' [ पृ. ३३ ], 'माणूस मेल्यावरहि त्याला पैसा लागतो' [ पृ. १०० ], 'माणसें बुद्धीनें वाढलीं तरी भावनेनें लहानच असतात' [ पृ. ९२ ], 'दाणे संपलेल्या कणसाकडे पांखरें कशाला येतील?' [ पृ. १०१ ], 'असत्याशीं झगडतां येतें, अन्यायाशीं झुंज देतां येते, पापाचें भांडें फोडतां येतें; पण प्रेमाचा, वात्सल्याचा, माउलीच्या मायेचा हा

§ पाहा : कलेचीं क्षितिजें, पृ. ८३.

प्रतिकार. केवढा भयंकर संग्राम ! ' [ पृ. ७ ], ' जसजसें शरीर झिजतें, पिचतें, तसतसा मनाला उजळा येतो, अंतःकरणाचे रत्नदीप प्रकाशतात ' [ पृ. ८ ]–हीं वाक्यें म्हणजे मानवी मनावर उमटलेले जीवनाचे ठसेच होत; जीवनाच्या टाकीच्या त्या खुणा होत !

ह्या सुजाण जीवनानुभवामुळें, अनुभवशील जीवनार्थशोधामुळें जीवनाशीं आशयपूर्ण संगति साधणारीं कथानकें आणि विषय तर ते निवडतातच, पण मानवी स्वभावाचे कांहीं विलक्षण नमुने ते लेखणीच्या चारदोन फटकाऱ्यांनीं वाचकांपुढें उभे करतात. ' स्वतःचें असेल नसेल तें सर्वस्व दुसऱ्याच्या स्वाधीन करून, त्या मंगल ठेवीची राखणदारी करीत फुलवातीच्या स्निग्ध प्रकाशांत तृप्त डोळ्यांनीं–त्या नेत्रज्योतींनीं आपल्या प्रियकराला ओवाळीत बसणारी ' स्त्री अगर नवऱ्याचें पत्र न आल्यामुळें, पुरुषाच्या सहवासाची भुरळ भागवण्यासाठीं, मित्राकडे जाऊन त्याच्याशीं विश्रब्धपणें वागूं पाहाणारी व ' हें पूर्णपणें विसरून जा, ह्यावरून कांहीं आडाखे बांधूं नका ' असें वर बजावून सांगणारी ' घार ' त्यांनीं ' यौवन 'मध्यें दाखविली होती, तशीच, प्रत्यक्ष पोटच्या पोराला ओळख न देणारी आई त्यांनीं ह्या संग्रहांत [ ' गंगा देखील आटली ' ] दाखविली आहे. ' अमरवेल ', ' माणूस कां रडतो ? ' ह्यांसारख्या कथांत मानवी स्वभावाचे अनेक उपरोधपूर्ण नमुने चोरघड्यांनीं रेखाटले आहेत.

चोरघड्यांच्या जीवनार्थशोधाला एक दिशा आहे, एक विशिष्ट ध्येय आहे. चोरघडे वर्ध्याला राहातात. वर्धा म्हणजे सेवाग्राम नव्हे; पण तपस्व्याच्या आश्रमानें ज्याप्रमाणें सबंध वनाला तपोवनाचें स्वरूप प्राप्त होतें, त्याप्रमाणें गांधींच्या वास्तव्यामुळें सेवाग्रामच्या आसपासचें वातावरण गांधीवादी मूल्यांनीं उजळलें आहे. शिवाय,

चोरघड्यांचा गांधीवादी कार्याशीं संबंध आलेला आहे. चोरघडे कर्मठ गांधीवादी आहेत असें मला म्हणायचें नाहीं. गांधीवादी कर्मकांडानें त्यांना घेरलेलें दिसत नाहीं. ते इतके गांधीवादी आहेत, कीं आपल्या गांधीवादाची त्यांना जाणीवच दिसत नाहीं. त्यांच्या अंतःकरणाच्या प्रवृत्तिच गांधीवादी झालेल्या आहेत. गांधीवादी मूल्यें त्यांच्या रक्तांत भिनलेलीं आहेत. ह्या मूल्यांना त्यांच्या प्रकृतीची जागृत जाणीव नसेल, पण लहानपणापासून तीं त्यांच्या प्रकृतींत ओतलीं गेलीं असावींत. ' अग्निदिव्यां 'तल्या एका सत्याग्रह्याप्रमाणें त्यांनीं ' आईच्या निष्ठेनें गायत्री जपली असावी. सवित्याचें हिरण्मय तेज त्यांच्या बुद्धीला चेतवीत असावें. तिच्या सांगीनें त्यांनीं मुंगीला साखर घातली असावी ' [ पृ.६ ]. थोडक्यांत म्हणजे, गांधीवादी संस्कृतीला अभिप्रेत असलेला संयम, सद्भाव, सुजनता आणि त्याग ह्यांची दीक्षा त्यांना लहानपणींच मिळालेली असावी. मोठेपणीं ह्या गुणांची त्यांनीं आपल्या जीवनांत वाढच करून घेतली. ह्या गुणांच्या योगें त्यांचीं जीवनमूल्यें ठरलीं आहेत. जगाचीं आजचीं मूल्यें निराळीं आहेत. साध्य आणि साधन, दोनहि दृष्टींनीं चोरघड्यांच्या जीवनमूल्यांचें विद्यमान जगाच्या जीवनमूल्यांशीं जमणें शक्य नाहीं. ह्या विसंवादाला त्यांनीं आपल्या लेखनांत वारंवार व्यक्तता दिली आहे. आपल्या मूल्यांच्या अभिजात स्वरूपाबद्दल त्यांना शंका नाहीं. जगानेंच आपलीं मूल्यें बदललीं असा त्यांचा दावा आहे. [ 'वस्तूचें मूल्य' ] अर्थात् त्यांत अवास्तव आग्रह मात्र नाहीं. किंबहुना त्यांच्या कथांत डोकावणारा टीकाकार अगर प्रचारक–त्यांच्या वृत्तींतला जीवनार्थसंशोधक आग्रही नाहींच. दलितजनतेविषयींची त्यांचीं अनुकंपा [ ' आजचें काम, ] या जीवन-मूल्यांचा साक्षात्कार घडविते. मात्र हा साक्षात्कार तात्त्विक नाहीं.

दलितजनतेविषयींची त्यांची अनुकंपा त्यांच्या वृत्तींत मुरलेली आहे. कारण, त्यांचें बालजीवन अक्षरशः दलितांच्या मांडीवरच पोसलें गेलें आहे. आणि म्हणूनच त्या तन्मयतेंत अभिनिवेश नाहीं. वाङ्मयापेक्षां जीवित श्रेष्ठ आहे असा जो साक्षात्कार त्यांना अलीकडे झालेला दिसतो त्याचेंहि मूळ ह्या जीवनमूल्यांतच शोधलें पाहिजे. त्यांच्या 'जीवनज्योती'ला 'शुद्धी'ची आस लागलेली आहे. निव्वळ वाङ्मय-स्नेहानें ती कोठवर उजळूं शकेल ह्याबद्दल त्यांना शंका वाटते. ध्येयाच्या ध्रुवताऱ्यावर दृष्टि अचल ठेवून कर्मपथावर पावलें टाकण्याचें कार्य अखंड सुरू ठेवण्यास ते उद्यत झाले आहेत. 'शुभास्ते पंथानः सन्तु' ह्याखेरीज माझ्यासारखा त्यांचा स्नेही ह्या वेळीं दुसरें काय म्हणणार ?

प्रभाकर पाध्ये

७७४, टिळक रोड, दादर,
तारीख १४ मे, १९४५

# आरंभीं

माझ्या संग्रहांना प्रस्तावना मीं कधीं लिहिली नाहीं, पण येथें कांहीं गोष्टींचा खुलासा अवश्य आहे.

'प्रस्थान' मध्यें सर्वच गोष्टी चांगल्या नाहींत. कांहीं सदोष आहेत, कांहीं आवडणारहि नाहींत कोणाला. पण 'प्रस्थान'समयीं मागचे पाश तोडून टाकावे लागतात. ह्या उद्देशानें ह्यांत कांहीं गोष्टी थोड्या कमी प्रतीच्या आल्या असतील तर वाचकांनीं क्षमा करावी. कारण त्यांपैकीं कांहींना लिहिल्यास एक तपावर अवधि लोटला आहे.

आज मी मनाच्या अशा अवस्थेंत आहें, कीं एकतर माझें कथालेखन बंद होईल किंवा चांगल्या जोमानें सुरू होईल. ह्यास्तव 'तमसो मा ज्योतिर्गमय' म्हणून ईश्वराजवळ मागणें मागितलें आहे.

माझे मित्र श्री. गोडसे ह्यांनीं प्रस्थानचें चित्र इतकें सूचक आणि चांगलें काढलें आहे, कीं माझी भूमिका मीं मांडली असती त्यापेक्षांहि जास्त चांगल्या रीतीनें मांडली गेली. मुखपृष्ठावरील चित्राकडे ह्या दृष्टीनें वाचकांनीं पाहावें अशी विनंती आहे.

संग्रहांत दोन गोष्टी अनुवादित आहेत. एक 'भारेवाली' आणि दुसरी 'जंगलची चांदणी.' पहिली श्री. प्रेमचंदांची आणि दुसरी डॉ. झाकिर हुसेन ह्यांची आहे. गोष्टींचा समावेश करण्यास मला श्री. श्रीपतराय आणि डॉ. झाकिर हुसेन ह्यांनीं परवानगी दिली ह्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

प्रत्येक गोष्टीच्या शेवटीं स्थळ, काळ, वेळ देण्याची पद्धति आज रूढ झालेली आहे. आपलेंहि कालवैसदृष्य टळावें म्हणून शोधून शोधून मीं वेळाहि दिलेल्या आहेत. ती ती गोष्ट लिहितांना कोणते कपडे आंगांत होते, कशी खुर्ची होती, पेन्सिल हिरवी होती कीं पिवळी हें त्या त्या वेळीं कांहींच लिहून न ठेविल्यानें आज देतां आलें नाहीं. ह्या वैगुण्या( ? )बद्दल वाचकांनीं क्षमा करावी.

'प्रस्थान' हा माझा चौथा लघुकथासंग्रह. आजवर मराठी वाचकांनीं माझें कौतुक केलें. मी त्याबद्दल कृतज्ञ आहें.

वामन चोरघडे

वर्धा, १२.५.४५

# ।१। आ वा ह न ।

भूदेवा, जागे व्हा आतां ! या निसर्गाच्या पुण्याईत आपलें पाप धुऊन टाका. वृक्षराजीच्या विशालतेंत आपला दांभिकपणा, गर्विष्ठपणा विसरून जा. ही पाखरांची किलबिल ऐका. परमेश्वराचे हे प्रेषित ज्ञानाच्या सतारी छेडीत आहेत. अतिशय हळुवारपणें, विनम्रपणें त्यांतले सूर हृदयांत सांठवून ठेवा !

मानवांवर अधिकार गाजविण्याचा जन्मसिद्ध हक्क तुमचा अशी तुम्हीं आपली समजूत करून घेतली आहे.

जगाला उद्धरणारे आपण असें तुम्हीं आजवर मानीत आलां आहांत—

नुसतेंच समजत आलां आहांत !

ज्ञानामृत पाजण्याचें काम तुमचें हा आठव तुम्हांला राहिला नाहीं.

असंख्य दुःखितांच्या मुखानें ही पाहा आदिमाता आक्रंदन करीत आहे. आईला दुखवून मातृद्रोह करूं नका !

हीं आमचीं खपाटीं गेलेलीं पोटें ! आम्हांला अन्न मिळत नाहीं. हीं आमचीं सुकलेलीं शरीरें, मळलेले आत्मे ! आम्हांला जीवनोदक मिळत नाहीं. याचें कारण काय ?

कारण तुम्हीं यज्ञ केलेला नाहीं.

आतां यज्ञाची सांगता करण्याची वेळ आली आहे. त्यांत आत्माहुति देण्याची वेळ आली आहे. प्रलयाचा काल समीपला आहे. यांत पापें भस्म व्हायला हवींत. 'अमृताचा' अधिकार त्याविना मिळणार नाहीं !

ह्या ज्वाला, हीं आक्रंदनें, पाहा किती जवळ आलींत. आतां वेळ लावून चालायचें नाहीं. ब्राह्मणाचा पोर अकालीं मेला म्हणून रामराजावर बोल आला. उद्यां आम्ही असेच अमंगल अवस्थेंत देवाच्या दरबारीं गेलों तर ?

तर या पापाचें प्रायश्चित्त फेडणार कसें ? जिणें असह्य होईल तुमचें. त्यापेक्षां उठा. आम्हांला अंधारांतून, संदेहांतून प्रकाशाकडे, सत्याकडे न्या ! श्रद्धा. अभिवादन !

पुणें—वर्धा प्रवास
१९.९.३७

## ।२। अ ग्नि दि व्य ।

आयुष्यांत सत्कार्योत्स्तव पुष्कळांशीं पुष्कळ वेळां मेळावा साधला. आजहि येथें झंझावातानें आमची वावडी केल्यामुळें जमलों आहोंत. आम्हां परस्परांतील सर्व भेदभाव निमाले आहेत. बाहेरच्या सुखदुःखांपासून आमची राखण करणाऱ्या भिंती अक्राळविक्राळ व भेडसावणाऱ्या अशा आहेत. जीव तोडून आम्ही ओरडलों तरी देखील आमच्या हृदयाचा हाकारा ह्या भिंती सहज पचवून टाकतील, ही विदारक जाणीव आमचें मन खात असते. कोसळणाऱ्या पर्वताचा सर्व गुरुभार आम्हां सर्वांना सहन करावयाचा आहे, या एकाच तीव्र जाणिवेनें आम्ही दडपून गेलों आहोंत.

जे जे सुखाचे क्षण पूर्वायुष्यांत वांट्याला आले असतील ते स्वप्नांत जमा झालेले आहेत. या भिंताडांचें निःशब्द हिडिस आक्रंदन, मजबूत गजांचे खडाखडा होणारे आवाज आणि सर्व सद्भावनांना पचवून निगरगट्ट झालेली निर्घृणता, हें सर्व सत्य, त्याविना बाकी सर्व असत्य ही खात्री झाल्यासारखी मनःस्थिति झाली आहे. सायंकाळच्या वेळीं अवचित कोठूनसा सुगंधी वारा आला, कीं सुख होतें. मध्यरात्रीं, थकून अर्धवट ग्लानींत असलेल्या शेजाऱ्याचें कण्हणें ऐकलें, कीं झोप भिऊन पळून जाते. अशा त्या जीव घेणाऱ्या शांत वेळीं दुरून

कोठून तरी हवेवर ऐकूं येणारें कुत्र्याचें भुंकणें मनाला धीर देतें. वाटतें, ज्या जगांत आम्हीं आमचीं सुखदुःखें पेरलेलीं होतीं, जेथें आमच्या शिणलेल्या शरीरावर मायेचे हात फिरले होते, जेथें आमच्या दुःखांना रत्नदीपांसारख्या तेजस्वी नेत्रांतून स्नेहकिरणें लाभलीं होतीं, तें सुजल, सुफल, मलयजशीतल असें बाहेरचें जग अजून आहे. आमच्या आयुष्याचीं पांचदहा वर्षें येथें, त्या जगापासून दूर अशीं गेलेलीं असलीं तरी त्यांच्यांत कांहीं एक बदल झाला नाहीं आणि कधीं काळीं त्यांच्यांत पुन्हा मिसळण्याची सुसंधि मिळाली तर मांडलेला डाव पुनः सुरू करतां येईल. आज तें जग दूरदूरचें वाटत असलें, स्वप्नमय भासलें, तरी तेंच सत्य आहे आणि हा काळ्या फत्तराचा, आमचे कोवळे जीव खाऊन टाकणारा पाषाणदुर्ग कितीहि सत्य भासला तरी तो असत्य आहे !

असत्यानें संमूढ होणें यासारखें संकट दुसरें नाहीं व म्हणूनच जणूं काय येथें असणारे सर्व जीव या संकटाच्या काळसावलींत एकरूप झाले आहेत. कधीं काळीं आम्ही वेगळे होतों ही जाणीवहि मनाला शिवत नाहीं. आमच्या सर्व शुभकामना, आशा, आकांक्षा आम्ही परस्परांत पेरून दिल्यामुळें आमचीं सर्वांचीं हृदयें भारावलेलीं आहेत व पांच वर्षांचें एक चिमुकलें जग येथें निर्माण झालें आहे. छोटीं सुखदुःखें येथें विस्तरित झालेलीं आहेत. आमचे सगळे सगेसोयरे, आमचे आप्तइष्ट आणि मायमाउली सर्व आम्हीच आहोंत !

सायंकाळीं पांखरें परतल्यावर थाळींत पडेल तें खाऊन आपल्या जागीं बसलों, कीं एका दिवटीच्या अपुऱ्या प्रकाशांत आम्ही सर्व मिळून, व्याकुळ, संभ्रमित चित्तानें ईश्वराला आळवितों आणि...

स्वस्थ पडून असतों. पाखरें झोपून जातात. झाडांचें पानहि हालत नाहीं. सर्वत्र नीरवता पसरते. परंतु आम्ही मात्र आमची सर्व शक्ति डोळ्यांत आणून व डोळे तारवटून दिसेल तितक्या दूर बघत बघत निपचित पडतों.

मध्येंच एखाद्याला गतदिवसांचा आठव होतो !

हा आमचा एक शेजारी. चार वर्षांपूर्वीं येथें आला तेव्हां कसा गोजिरवाणा, राजबिंडा दिसत होता. आज त्याचीं सगळीं हाडें मोजून, शिकलेल्या गणिताची मला उजळणी करतां येते. परवां तो म्हणाला,

" माझी आई माझ्या स्वप्नांत आली होती. तिनें मला कुरवाळलं. तिचे डोळे पाण्यानें भरले होते. ती कळवळ्यानें मला म्हणत होती, ' तूं परत ये. आतां पुन्हा म्हणून कधीं तुझ्या हिताला मी माझ्या प्रेमाचं बंधन घालणार नाहीं. तुला हवं तें कर, पण माझ्या दृष्टिआड होऊं नकोस. हे शिणलेले डोळे आतां एकदम मिटतील. मिटायच्या अगोदर तूं मला दिसला नाहींस तर '..."

त्याच्यानें पुढें सांगवलें नाहीं आणि आमच्यानें धैर्य धरून ऐकवलेंहि नाहीं. त्याचे डोळे उष्ण आणि खाऱ्या जीवनरसानें भरून आले. त्या माउलीच्या स्मृतिगंगेंत आमच्याहि आसवांच्या कावडी आम्हीं रिकाम्या केल्या !

स्वप्नांत दिसलेली ही त्याची आई ! केवढ्या कष्टानें तिनें त्याचा पिंड पोसला होता ! त्याच्या पायांत एवढासा कांटा जरी बोचला, तरी तिच्या नेत्राची बाहुली दुखावत असे. न्हाऊन, माखून, प्रेमाचे घांस भरवून, एकदा त्याला शाळेंत पाठवला, कीं ती सूर्याची प्रार्थना

करीत असे, 'देवा, तुझ्या किरणाची उभारी त्याच्यावर पडूं देऊं नकोस.' त्याला कधीं कोणीं चांगलें म्हटलें, कीं हिचें थकलेलें शरीर तारुण्याच्या जोमानें काम करूं लागे. हा शिकेल, फार चांगला होईल, ही तिची महत्तम आकांक्षा !

त्यानेंहि आईच्या आज्ञेनें निष्ठेनें गायत्री जपली होती. सवित्यान्चें हिरण्मय तेज त्याच्या बुद्धीला चेतवीत होतें. तिच्या सांगीनें त्यानें मुंगीला साखर घातली होती आणि आतां संत्रस्त, उपाशी मानव-जातीच्या पोटांत अन्नाचे कण जावेत व त्यासाठीं हवा असल्यास आपला जीवहि खर्चीं पाडावा ही तळमळ त्याला लागली होती. आईच्याच आज्ञेनें त्यानें पिंजऱ्यांतील पोपटाला मोकळें सोडून दिलें होतें आणि आतां सगळ्यांच्या लोहशृंखला तुटाव्यात म्हणून लोखंडी घण उचलण्याचा हटातटाचा प्रयास तो करीत होता.

ह्या वात्सल्याच्या उबदार घरट्यांत आईच्या मांडीवर डोकें टेकून स्वस्थ झोपला असतांना एकाएकीं त्याची आई विश्वव्यापी झालेली त्याला दिसली. तिची दिव्य, विशाल, पाशबद्ध आकृति...

...तो तसाच उठला, आईला तिच्याच प्रेमाची शपथ त्यानें घातली आणि विनविलें, " मला जाऊं दे. मी तुझीच सेवा करीन. तुझाच उपकार स्मरेन, पण ह्या तुझ्या पाशांतून मला मोकळा कर."

पण तिचें तें रक्तामांसाचें शरीर हा पोटचा गोळा दूर करायला तयार नव्हतें. संगर सुरू झाला. आंगांतल्या सर्व शक्तींनीं पोसलेला देवाघरचा मातीचा हा गोळा तिनें आपल्या बाहुपाशीं घट्ट आवळून ठेवला होता. असत्याशीं झगडतां येतें, अन्यायाशीं झुंज देतां येते, पापाचें भांडें फोडतां येतें, पण प्रेमाचा, वात्सल्याचा, माउलीच्या

मावेचा हा प्रतिकार. केवढा भयंकर संग्राम !

आमचे मेंदू या पलीकडे कल्पना करायला असमर्थ ठरले आहेत. इतक्या वर्षांच्या निष्क्रियतेनें बधिर झाले आहेत ( आणि म्हणूनच आम्ही जिवंत राहिलों आहोंत ), कल्पनाशक्ति आणखी ताणली, कीं स्मृतीच्या तारा छेडल्या जातात व सुखाची सवय निमून गेल्यामुळें तो झंकार सहन होत नाहीं.

माझ्या बाहूवर कढत अश्रु टाकणारा आणि शरीरस्पर्शानें धिवसा मिळवूं पाहाणारा हा माझा आणखी एक साथी हुंदके देत आहे व कोणाचें तरी नांव अस्पष्ट उच्चारीत आहे. गेल्या सहा वर्षांत या नांवाचा उच्चार करण्याची त्याची सवय तुटली आहे. पण तत्पूर्वी अग्निसाक्ष, देवा-ब्राह्मणांच्या समोर त्यानें तें नांव उच्चारलें होतें आणि जीविताच्या सातत्यासाठीं त्या व्यक्तीला ध्रुवाचा तारा दाखविला होता. त्याचें जीवन मात्र अस्थिर ठरलें व कोणाची तरी आर्त हाक ऐकून ते सर्व रेशमाचे पाश त्यानें सोडविले. ही आठवण त्याच्या अंतःकरणाच्या कोपऱ्यांतून त्याला डिवचते. ही आघाडी त्याला केवढी जड गेली !

ह्यांचीं जीवनचरित्रें माझ्यानें ऐकवत नाहींत. मी देखील अशाच लढाईंत थकलेला एक सैनिक आहें. माझ्याहि जिवावरचें दडपण जरा उचललें तर ? माझा आधार घेऊन वाढत असलेल्या, मोठ्या पहाटे कपिलेची धार काढून कोमट दुधानें भरलेला रुप्याचा प्याला मला आणून देणाऱ्या आणि माझ्या स्निग्ध दृष्टीनें झालेले श्रम विसरणाऱ्या त्या चिमुकल्या रुचिर, सुकोमल मुलीची ती आठवण ! ती बुजविण्यास केवढी झटापट करावी लागली !

# प्र स्था न

आम्हांला कोणीं हाक मारली होती? कोठलें आक्रंदन आमच्या कानीं आदळलें होतें? आज या तथाकथित मोठ्या युद्धाला तोंड देत आहोंत. देह पडेपर्यंत ही झुंज चालेल व नंतर आमच्यापुरती संपून जाईल. देह पडण्याची मुळींच भीति वाटत नाहीं, कारण तो झिजविण्याची सवय झाली आहे व जसजसें शरीर झिजतें, पिचतें, तसतसा मनाला उजळा येतो, अंतःकरणाचे रत्नदीप प्रकाशतात.

पण यापूर्वींच्या झुंजेंत सुगंधी मनें आणि दीपज्योति यांच्याशीं समर होता. तो आम्हीं जिंकला. आमच्यापैकीं प्रत्येकाला जीवनाच्या त्या आघाडीवर एक लढाई द्यावीच लागली. एक अग्निदिव्य करावेंच लागलें. म्हणून या आघाडीची तादृश्य भीति वाटत नाहीं. भीति तरी कशाची? सोन्याला कस तर पूर्वींच लागला. अग्नीनें तें पूर्वींच शुद्ध झालें! आतां केवळ या देहाचें हें फाटकें चिरगूट फेकून देणें आहे. जीवन सफल करणें आहे. हें चिरगूट गेलें रे गेलें, कीं जीवपक्षी बंधमुक्त होईल. सगळ्यांची चिरंतन भूक शमेल आणि जिनें आम्हांला हाक मारली, ती फळांफुलांनीं, वस्त्राभूषणांनीं, सुमंगल, समृद्ध आणि शुचि होऊन आम्हांला दर्शन देईल!

नागपूर–जेल
ता. १३·१२·४२
रात्रीं ९·४५

## ।३। आ ज चें का म ।

हें केवळ करमणुकीसाठीं लिहीत नाहीं. तसा वेळ आपल्यापैकीं कोणालाहि असतां कामा नये, असे दिवस आज आले आहेत. सर्व यंत्रें आज भराभर व अविरत चालत आहेत. सरळ चालतात, उलटींहि चालतात. ज्यांतून जें बनेल तें तयार होतें, उमाप निर्मिति होते. तरीहि कमीच पडतें. अशी ही काळवेळ आहे. या दिवसांत तुम्हां आम्हांला फुरसत कोठली, उसंत कोठली ?

आणि म्हणून हा साधासुधाच प्रसंग निवडला आहे. लिहायला सोपा, वाचायला आटोपशीर. एक मुलगी होती सहा वर्षांची. आंगावर कांहीं नव्हतें तिच्या. कमरेला फक्त एक चिंधी गुंडाळलेली होती. तिच्या कडेवर एक मूल होतें तान्हें. रडत होतें. ती भिक्षा मागत होती.

आतां पुढचें तर आपण आपल्या कल्पनेनें रंगवून गोष्ट वाचण्याचे श्रम वांचवूं शकतों. बंगालनें फार वेगळया रीतीनें आपल्या कल्पनेला धार (?) दिली आहे. पण या गोष्टींतल्या मुलीला मारायचें नाहीं. जगवायचें आहे. सबब, गोष्टीच्या शेवटाबद्दलची तुमची कल्पना कदाचित् चूकहि ठरूं शकेल.

सायंकाळची वेळ. डिसेंबरची थंडी. हिरव्या बागेच्या शेजारून ती पोरगी त्या पोराला घेऊन चाललेली. कदाचित् थंडीनें असेल, कदाचित्

भुकेनें असेल, तें कारटें जोरजोरानें रडत होतें व तिला बिलगत होतें. ती त्याला घेऊन मधून मधून धावत सुटे. ऊब यावयासाठीं असेल ! थकली, कीं हळू चालावयाला सुरुवात करी. भुकेनें तिची शक्ति संपुष्टांत आणली असेल. तिच्या डोळ्यांतून पाणी तरारत होतें पण त्या मुलापेक्षां ती पुष्कळच मोठी असल्यामुळें तिला रडण्याची लाज वाटत होती.

ती त्या मुलाला समजावीत होती. पाठीवर हात फिरवीत होती. सांगत होती, " उगा ! रडूं नकोस. तें घर दिसतं तिथें आपल्याला भाकरतुकडा मिळेल. तो तुला देईन. मग खाऊन झोप. "

खाण्यापिण्याची चौकशी आईला शोभते. आईचें आंतडें या सर्व गोष्टींची विचारपूस करतें. ही मुलगी त्या पोराची कोण ? कोणी नाहीं ? त्याची आई कोठें गेली ? कदाचित् मेली असेल पाय घासून भुकेनें ? जगवितां आलें तोंवर जगविलें असेल मुलाला. कदाचित् मुलाला टाकून गेली असेल ! पण जाणार कोठें ? मसणांतच ना अखेर ?

तें मूल त्या पोरीला रस्त्यावर दिसलें. दुःखाच्या सहवेदनेनें तिनें त्याला कडेवर घेतलें. त्या पोरानेंहि तिला बिलगून आपली मनीषा व्यक्त केली. परस्परांच्या गरजा परस्परांना समजल्या आणि जगण्याच्या मोहिमेवर उभयतां निघालीं. एक वर्षाचें मूल व त्याची सहा वर्षांची आई ! जगतील तर दोघेंहि. मरतील दोघेंहि !

सायंकाळची वेळ. कोट घातलेल्यांना थंडी वाजत होती. भरल्या पोटावरहि ऊब येत नव्हती. मग त्या दोघांच्या आंगावर तर कांहींच नव्हतें. अन्नाची उब देखील नव्हती. ती चारदोन घरांच्या दरवाजां-पाशीं गेली. हाका मारल्या. भाकर मागितली. एका घरचें कुत्रें आंगावर धावून आलें. एका घरचा मालक खेकसला. एका श्रीमंत

पोरानें त्यांच्या आंगावर पाणी फेकलें व आपली करमणूक करून घेतली. दिलें मात्र कोणीं कांहीं नाहीं.

आपले आदर्श अद्ययावत् आहेत. भीक घालणें हा गुन्हा आहे असें सोइस्कर तत्त्व आपण व्याकरणासारखें पाठ केलें आहे आणि सनातन्यांसारखे त्याला चिकटून बसलों आहोंत. सबब, आपल्या बुद्धींत, अंतःकरणांत या नव्या आईची, तिच्या त्या मुलाची कसलीच भूक शमविण्याचें सामर्थ्य राहिलें नाहीं. होय सामर्थ्य! मी तर अशीच भाषा वापरणार! आपण दुसरी भाषा वापरून आपल्या मतलबांवर शब्दांचें रेशमी पांघरूण घालूं शकतां!

अखेर ती बिचारी कष्टानें पाय उचलीत गेली दूरवर! एक नळ होता रस्त्याच्या बाजूला. सुरू होता. त्यांतलें गार पाणी तिनें मुलाला पाजलें. स्वतः प्यायली आणि जवळच्याच दगडी पुलावर थोडा वेळ बसून राहिली. कोणाची वाट पाहात होती? मृत्यूची??

या पुढची तिची गोष्ट ऐकण्यांत तुमचा आमचा फार फायदा होईल असें नाहीं. कांहीं नवें मिळेल असें तर मुळींच नाहीं. आपली नाविन्याची भूक कांहीं विलक्षण आहे. जें काल घडलें तें आज झालें तर आपल्याला कंटाळा येतो. आपले लोक रोज भुकेनें मरतात. म्हणून आतां त्याचें आपल्याला कांहीं वाटेनासें झालें आहे. हिमालय आपल्या शेजारीं आहे. रोज दिसतो. पण त्याचींहि बर्फाच्छादित शिखरें सतत परिचयानें आपलें कुतूहल जागें करीनाशीं झालीं आहेत. ना आपली बुद्धि त्यामुळें विशाल झाली, कीं शरीरें पर्वत चढून गेलीं! त्यानें रोज दिसणें हा त्याचा अपराध. आपला थोडाच आहे? तसेंच त्या मुलीचें, त्या अर्भकाचें. त्यांचें दुखान्त अल्पचरित्र नवीन नाहीं

आपल्याला ! तीं मरतील त्यांतहि नावीन्य वाटावयाचें कारण नाहीं !

पण त्यांच्या मरणांत जर नावीन्य नाहीं तर जगण्यांत तरी खास असेल आणि त्यांना जगविण्यांत तर खचितच असलें पाहिजे !

याच आशेनें एक कल्पना आपल्या पुढें मांडण्याची धृति झाली आहे. डोळे, मन, बुद्धि असलेलें त्या मुलीचें यंत्र फिरलें आणि त्या मुलासाठीं एक यंत्राची आई निर्माण झाली. याचें श्रेय आपल्याला नाहीं. मराय मारायला जर माणसाच्या जागीं माणूस येऊन यंत्रें चालवूं शकतो तर जगाय जगवायला आईबापांच्या जागीं आईबाप निर्माण होऊन हें मानवी यंत्र चालवूं शकणार नाहींत का ? आई खायला देते, बाप ल्यायला देतो. दोन्ही गोष्टी साध्या आहेत. विसाव्या शतकांत यंत्रांनीं अनेक चमत्कार केले. चमत्कार त्या यंत्रांनीं केले, ज्यांना बुद्धि, मन, डोळे नाहींत; सर्वांत महत्त्वाचें म्हणजे चैतन्य नाहीं. त्यांनीं विश्वव्यापी संहारक शक्ति निर्मिली. पण चैतन्यशील, डोळस यंत्राच्या साहाय्यानें विश्वव्यापी तारक शक्ति खास निर्माण करतां येईल. वात्सल्याचें पाणी व संकल्पाचा कोळसा घालून हृदयाची कळ फिरविली तर या ' न भूतो न भविष्यति ' अशा जगङ्व्याळ यंत्राचीं चाकें फिरूं लागतील. इतर यंत्रांनीं उलटें करून दाखविलें. हें मानवी यंत्र सुलटें करून दाखवील आणि भुकेल्या मानव जातीच्या भरण-पोषणासाठीं, जीवितासाठीं आईबापांची रीघ लागेल !

हें तरी श्रेय आपण घ्यावें हा तसदी देण्याचा उद्देश !

वर्धा

ता. ८·१२·४३

सकाळीं ६ वाजतां

## ।४। महायात्रा ।

सध्याच्या घडीपुरतें आपण असें धरून चालूं या, कीं तुमचा, माझा, आपणा सर्वांचा देवावर विश्वास आहे. आपण सारे आस्तिक आहोंत, देवाच्या अधिकाराची आणि मर्यादांची आपल्याला जाणीव आहे.

तथापि तुमची जर अशी कल्पना असेल, कीं देव भीत नाहींत, तर ती सपशेल चुकीची. संघटित, निश्चयी आणि प्रतापी अशा कोणत्याहि मनसुभ्याला देव भितात. पुराणांमधून हजारों वेळां माणसाच्या प्रतापानें देवांचीं सिंहासनें हादरल्याचे दाखले मिळतात.

परंतु असें असलें, तरी देव कधींहि अयशस्वी होत नाहींत हें खरें! याला अपवादात्मक असें एकहि उदाहरण तुम्हांला शोधून सापडावयाचें नाहीं.

मांडवगडचें भवानीचें ग्रामदैवत मोठें जाज्वल्य होतें. पुष्कळांच्या नवसाला पावलें होतें. भवानीचा दरारा आजूबाजूच्या पांच पंचवीस गांवांत होता. चांगला पीवरतनु बोकड देऊं करून कसलाहि नवस केला तरी देवी पावत असे. तिच्या प्रसादानें पुष्कळांना मुलें झालीं होतीं. हजारों दुर्दैवी विधवांना आसरा मिळाला होता. हजारों ब्रह्मचाऱ्यांना खुराक मिळत होता. यापेक्षां आणखी काय हवें?

पूर्वी असें सांगतात, कीं त्या देवीला नरबली लागत असे आणि तो तिला नियमानें पुरविण्यांत येई. कोवळीं अर्भकें तिला फार आवडत. ती आपल्या प्रिय भक्तांना दृष्टान्त देऊन पुत्र, भाऊ, सोयरा कोणी तरी मागत असे आणि स्वतःचें तोंड रक्तानें माखून घेत असे. देणाऱ्यांचा त्याग, घेणारांचें सुख ! रक्ताचा टिळा हा देवीचा प्रसाद. भिजलेली कट्यार हें देवीचें व्रत आणि मनोरथ पूर्ण होण्याची दृढतम 'आशा' हाच देवीच्या प्रसादानें मिळणारा मोक्ष !

आशा जगविण्यालाहि किती सायास करावे लागतात !

इंग्रज सरकारच्या राज्यांत जाहीरपणें माणसें मारतां येत नाहींत. कारण हीच महादेवता सारीं माणसें खाऊन टाकते. एखादा चुकून माकून उरलेला हविर्भाग भवानी देवतेला मिळावयाचा. पण तो मिळवितांना देखील त्यांत तिला किती किती कसब खर्चावें लागत होतें. मँचेस्टरचे व्यापारी जितक्या शिताफीनें हिंदुस्थानचीं माणसें त्यांच्या धंद्यासकट गट्ट करीत आणि तोंडावरचें अवघें रक्त संभावितपणें पुसून टाकीत त्याचप्रमाणें देवीलाहि करावें लागत असे. देव झाले तरी परिस्थितीशीं थोडेच झगडणार आहेत !

ह्या देवीच्या गांवीं म्हणजे मांडवगडला वर्षांतून दोनदा यात्रा भरत असे. वर्षाकांठीं मोजून ठेवलेला पैसा गरीब लोक देवीला अर्पण करीत असत. मग मुलें उघडीं असलीं तरी तिच्या कृपेचें पांघरूण आहेच ! रांडापोरें उपाशी मेलीं तरी पण मोक्षाची भूक शांत होणार ती ?

आणि तुम्हांआम्हांसारख्या कांही लोकांनीं देवीला बळी द्यायचें

नाकारलेंच तर ती येऊन किंवा आपले दूत पाठवून पोरें बायका पळवीत असे. तिचे दूत हुशार असत. गांवच्या साऱ्या विहिरींत ते विष टाकीत. लोकांना वाटे महामारी आली. देवीचें देऊळ दह्या–दुधानें, भाता–रक्तानें भरून निघे. दोन्ही बाजूनें फायदा. कधीं कधीं ते दूत असंख्य डांस गांवांत सोडून देत. रात्री-रात्रींतून हजारों डबकीं निर्माण करीत आणि बिचारे हवालदिल लोक हिंवतापानें मरून जात. उंदरांची आणि घुशींची खास पैदास देवीनें मंदिराजवळ केलेली असे. कधीं दूत महारोगी बनून येत आणि सारा रोग पसरून चालते होत. करालवदना, लोलजिव्हा, चामुंडा, भवानी हजारों माणसें दर वर्षीं या ना त्या निमित्तानें फस्त करीत असे. वरचा नैवेद्य तिला चटणीसारखा पुरे! देवी तृप्त असे. लोक देखील तृप्त असत!

सणासुदीं गोडधोड असतें म्हणून मुलें आनंदी असतात. संक्रातीला तिळगूळ असतो म्हणून बायकांना हर्ष होतो. त्याचप्रमाणें महायात्रा जवळ येत चाललेली पाहून देवतेच्या मंदिराला कळा यायला लागली. मंदिर सुशोभित होऊं लागलें. सतेज दिवे लावण्यांत आले. घंटा रात्रभर बडविण्यांत येत. टाळ मृदंग आणि कोंबड्याबकऱ्यांचा आर्त तडफडाट यांनीं सारें वातावरण कसें दुमदुमून जाई. मोक्षाचे दरवाजे उघडे करण्यांत येत. देवदूतांना मुद्दाम कामावर हजर राहाण्यासाठीं तंबी भरण्यांत येई. लोकांना वेगवेगळीं स्वप्नें पडत. स्वर्गाचीं द्वारें देवादिकांनीं गच्च भरत. इंद्र, वरुण, यांच्याशीं तह होत आणि मिळतील ते बळी मुकाट्यानें आपसांत कसे वांटून घ्यावयाचे यासंबंधींचे लेखी करारमदार होत असत!

एरव्हीं क्रोधसंतप्त असलेलें भवानीचें मुखमंडल देखील या वेळीं मोठें प्रसन्न, मोठें सुंदर, मोठें कोमल असें दिसत असे. शरदृतूंतील कमलेंहि त्यापुढें फिकीं पडत. नितळ आकाशांतील नक्षत्रेंहि मुखकमलांच्या कांतीनें लाजून •जात आणि लपत. कोवळी काकडी, पारिजातकाचीं फुलें देखील त्या कोमलपणापुढें आत्मनिर्भत्सना करीत. त्या मुखाची अवर्णनीय शोभा काय वर्णन करावी !

परंतु या खेपेला मात्र देवीचें मुखमंडल अगदीं काळवंडून गेलें होतें. सर्व सुरळीत होऊनहि जिकडे तिकडे औदासिन्याची सावली पडली होती. मंदिराच्या कळसावर घुबडें ओरडूं लागलीं होतीं. कोंबडे, बकरे ओरडेनासे, मिळेनासे झाले होते. विहिरींत टाकायच्या विषाच्या पुड्या देवदूतांनीं हरवून टाकल्या होत्या.

काय करावें हें देवीला आणि दूतांनाहि समजेना. सण साजरा होत नाहीं. गरिबांना सणाचें कांहीं वाटत नाहीं पण श्रीमंतांना कुळाचार असतात. स्वतःला नाहीं तर नाहीं, पण ज्यांच्याशीं करारमदार करून आपल्या सद्या आपण गुंतविल्या त्यांच्या गरजेपुरते निदान सात आठशें नरबलि तरी मिळायला हवेत !

हे नरबली आणायचे कसे ? हें अवघें झालें काय ?

नरबलि कसे आणायचे हें देवीचें देवीनें ठरविलें आणि ती यशस्वी झाली !

जें घडलें तें असें—

मांडवगडपासून सहा मैलावर तहसिलीचें स्थान होतें. तेथें 'जनसेवा-संघ' स्थापन झाले होते. सर्व भेदभाव निमाले होते व हिंदु, मुस्लिम, कॉंग्रेस सर्वांचा एक दिलाचा मनसुभा ठरला होता, कीं

मांडवगडच्या यात्रेंतील मनुष्यसंहार थांबवावा. स्वयंसेवकांनीं प्रतिज्ञा केल्या. मेघगर्जनेपेक्षांहि त्यांचे बोल अधिक निनादले. पितामह भीष्मांपेक्षांहि घनघोर अशा आणाशपथा त्यांनीं घेतल्या. स्वयंसेवकांच्या तुकड्या पडल्या. कोणी म्हणाले, "आम्ही सडका झाडून स्वच्छ ठेवूं. उसाचीं चिपाडें देखील सांचूं देणार नाहीं. संत्र्यांचीं सालपटेंहि वेचून घेऊं. वीस हजार लोकांना यत्किंचितहि त्रास पोचूं देणार नाहीं." कोणी म्हणाले, "आम्ही अवघ्या यात्रेकरूंना स्वच्छ पाणी पुरवूं. नदींतलें पाणी अगदीं आरशासारखें स्वच्छ ठेवूं." कोणाला औषधें माहीत होतीं. कोणी रोगनिदान करण्यांत पटाईत होते.

चौघांचा मनसुभा झाला. सर्व एकत्र जमले आणि निसर्गाविरुद्ध युद्ध करण्यास त्यांनीं हात सरसाविले !

देवी घाबरून गेली. आतां कसें करावें? यात्रा हातातोंडाशीं आली होती. क्षणक्षण जात होता. पृथ्वीचीं चाकें फिरत होतीं. सूर्याचा प्रवास थांबत नव्हता.

युद्ध सुरू झालें !

लोकांना स्वप्नें पडलीं, कीं यात्रेला न आल्यास नापिकी होईल. बळी न दिल्यास मुलेंमाणसें खाऊन टाकूं. देवदूतांचीं अक्राळ विक्राळ तोंडें मेडसावूं लागलीं. दरवर्षापेक्षां जास्त लोकांनीं यात्रेला यायचा पण केला.

यात्रा भरली. दर वेळीं यात्रेंत जें घडतें तें सारें घडूं लागलें. लाल लाल फुलांचीं दुकानें देवळांच्या पायऱ्यांवर गर्दी करून बसलीं. हजारों बैलगाड्यांनीं गांवगुलाल आकाशांत उडविला. आजूबाजूचीं शेतें माणसांनीं गजबजलीं. नदीच्या कांठींच देहधर्म सुरू झाले. भटाऱ्यांचीं

दुकानें उघडलीं. रस्त्यांतली धूळ त्यांत जाऊन पडूं लागली. भजीं, चकल्या, शेव यांची संख्या आणि ऐवज वाढूं लागला. देवीच्या मंदिरांत भाविक बायका जमल्या. देवभोळे त्यांच्याकडे पाहूं लागले. कारण आंत रीघ नव्हती. बायका नवीं लुगडीं नेसल्या. मुलांनीं आंगडीं टोपडीं घातलीं. माणसांनीं नवा पोषाख चढविला. यात्रेची मिठाई मणानें खपूं लागली. नवस पूर्ण झाले.

दूत आले. त्यांनीं युद्धाची जय्यत तयारी केली. डबक्यांतून, विहिरींतून, अन्नांतून विष कालविलें गेलें. सारी सांगता यथास्थित झाली.

बिचारी सखू ! आपल्या लहानशा अर्भकाला घेऊन आली होती. ती गाडीखालीं उतरली. मुलानें धूळ गेल्यामुळें डोळे चोळले, शिंका दिल्या. त्याच्या हातीं मिठाईचा पुडा देऊन ती बिचारी देवीच्या देवळांत जावयास निघाली. मुलगा तहानला. ‘आई, पाणी...’ ही त्याची हाक आईचें हृदय पिळवटूं लागली. तिनें आजूबाजूला शोधलें. वाळवंटांत डबकें होतें. त्यांतला कचरा हातानें दूर केला. तिला तसें करूं नको असें सांगायला तेथें कोणीहि नव्हतें. मूल पाणी प्यालें, ओकलें आणि त्याच्या जिवाचें सोनें झालें. त्याला महायात्रा घडली !

बांगड्या भरणाऱ्यांनीं मऊ मऊ हात दाबून घेतले. टारगटांनीं अंगस्पर्श अनुभविला. पुजाऱ्यांनीं सर्व प्रकारचीं फुलें पाहून घेतलीं... कोरांटीचीं, धोतऱ्याचीं, गुलबाक्षीचीं !

आणि सर्वांत नवलाईची गोष्ट अशी, कीं प्रतिज्ञा करून मेघांना घाबरविणारे भीष्मांचे वंशज तेथें कोणीही दिसत नव्हते. वाळवंटांत त्यांचे झेंडे फडकत होते. फडकीं फडफडत होतीं. वाऱ्यानें फाटून गेलीं होतीं, धुळीनें मळलीं होतीं. त्यांना वाली नव्हता !

करालवदना चामुंडीचे सर्वच डाव यशस्वी झाले होते !

हजारों लोकांच्या जिवाचें सोनें झालें होतें. त्यांना महायात्रा घडली होती !

आतां तुमची अशी कल्पना असेल, कीं महाकाली प्रसन्न झाली असेल, तिचें मुखमंडल कमलासारखें सुंदर, नक्षत्रासारखें सतेज आणि पारिजातकासारखें कोवळें, हसतमुख झालें असेल !

पण आपण ज्या गोष्टी नक्की होतील असें म्हणतों त्या होतातच का ? हटकून खोट्या ठरतात !

देवीच्या देवळांत गेलेला आणि जिवाचें सोनें न झालेला प्रत्येक यात्रेकरू सांगत होता, " महाकाली रडत होती. तिच्या डोळ्यांतून टपटपा आसवें गळत होतीं. घामानें शरीर चिंब झालें होतें. गरिबांच्या घामानें भिजलेला पैसा देवीच्या पायांजवळ पडला, कीं तिला शहारून येई. गरिबांच्या रक्तानें, मांसानें पोसलेला पोटचा गोळा एका ओकारी-सरसा पटकन् मेलेला पाहिला आणि दूतांनीं खबर दिली, कीं तिला हुंदका येत असे."

हें रडणें स्त्रीसुलभ नव्हतें. वादळापूर्वीची ती शिंपण होती. पुढल्या प्रलयाचीं चिन्हें तर नव्हत ? पुढें काय होणार ?

ती पाहा ! ती पाहा, मंदिरांतील घंटा वाजत आहे. तिच्यांतून स्पष्ट ध्वनि निघत आहे. ऐकून घ्या. " आजच्या यात्रेचा संदेश ! माझ्या भक्तांनो, यात्रेंतील तुमचीं मुलें या ना त्या स्वरूपांत तुम्हांला परत मिळतील. माझी भूक कशानें भागवावी हें आतां मला नीट उमगलें आहे. मी यापुढेंहि नरबली भक्षण करीन. रक्तामांसानें माझी भूक भागवीन पण ती भूक तुमच्या रक्तानें नव्हे. आशीर्वाद...! "

# प्र स्था न

देवीचा नृसंहार बंद पडला नाहीं. परंतु त्यानंतर मांडवगडच्या आसपास भाकरीला भाकर म्हणणाऱ्या, कामाला काम म्हणणाऱ्या, एकाहि प्रामाणिक माणसाचा, बाईचा, अर्भकाचा बळी देवीनें घेतला नाहीं. स्वतःची भाकरी स्वतःच्या घामांत बुडवून ते सुखानें खाऊं लागले आणि सुखानें राहूं लागले.

महाकालीला त्यानंतर एकच गोष्ट सहन होत नसे आणि ती म्हणजे मेघगर्जनेपेक्षांहि जास्त निनादणारे शब्द, नुसतेच शब्द ! ते शक्य तितके कमी ऐकूं यावेत हाच तिचा प्रयास !

वर्धा,

रविवार २२.२.३९

## ।५। गुलामांचे संकल्प

।१।

रोमन सीझर ! नांव ऐकलें, कीं नुसता थरकांप उडायचा गुलामांच्या आंगांचा. किती भेदरून जायचे ते ! जिकडे जागा सापडेल तिकडे भराभर पळून लपून बसतांना त्यांची कोण धडपड ! उंदीर बिळांतून जसे पाहातात तशाच प्रकारचें त्यांचें पाहाणें ! त्यांच्या जीवनांत खाण्यापिण्यापेक्षां त्या भीतीचीच जास्त धसक होती.

हातांतील पहार त्यानें खालीं ठेवली. किंचित् इकडे तिकडे पाहिलें. कोणीच त्याच्याकडे पाहात नव्हतें. त्यानें आपल्या केसांत दोन्ही हात खुपसले. किचकट घाणीनें ते भरून आले. त्यानें संतापून हात जमिनीवर आपटले. स्वतःच्या दंडांकडे नजर जातांच त्याच्या डोळ्यांत पाणी आलें. हातांतील पहारीइतकीदेखील त्यांची जाडी राहिली नव्हती. पहार लोखंडाची असून वापरून वापरून पांढरी झाली होती. त्याचे हात मात्र जास्त सुरकुतून गेले होते. खर्रखर्र खाजविलें, कीं आंगाचा भुसा उडायचा. त्याला स्वतःचीच किळस आली. विमनस्कपणें तसाच तो बसून राहिला. डोक्यावर सूर्य तळपत होता.

ऐन दुपार ! पोटांत कांहींच नाहीं. काम मात्र झालेंच पाहिजे.

चार दिवसांनीं सीझरच्या राज्यांत मोठा विजयोत्सव होणार ! मिरवणुकीसाठीं शहरभर पताका लागल्याच पाहिजेत. त्या उत्सवाची त्याला एकदम आठवण झाली. अजून किती तरी खड्डे खणायचे होते. तो कामास लागला.

' खण्ण् ...' ! दगडावर पहार आपटून ठिणगी उडाली. त्याच्या डोळ्यांसमोर चमक आली. मागच्या लढाईत त्याचा भाला असाच चमकला होता. एकेका फेकीनें त्यानें शत्रूकडील कित्येक शिपायांना लोळविलें होतें. त्याबद्दल त्याला सेनापतीकडून शाबाशी मिळाली होती. पण त्याचें आतां त्याला काय ? काय उपयोग आतां सर्व गोष्टींचा ! एकच गोष्ट यापुढें त्याला करणें आहे. रक्ताची गुळणी पडेपर्यंत काम आणि बादशहाची नजर चुकविण्याची अक्कलहुशारी !

त्याच्या देशाचा राजा हरला. त्याला गुलामी आली. बरोबर त्याचा एक शेजारीहि पकडला जाऊन गुलाम बनविण्यांत आला होता. दोघेहि संत्रस्त झाले होते.

" यांतून माझी मरेपर्यंत सुटका होणार नाहीं का ? बादशहा, मी इथेंच मरणार का ? पळून गेलों तर...? पण जाणार कुठें ? "

रोमचा राजा शेकडों मैल हात लांब करून बसला होता. तेथली सारी हवा त्याच्या हुकमानें वाहात होती.

" माझा दोस्त मला साथ देईल. आम्ही दोघे मिळून पळून जाऊं. जंगलांतच राहूं. "

त्याला किंचित् समाधान झालें. पुनः त्यानें इकडेतिकडे नजर टाकली. वरिष्ठ अधिकारी उत्सवाच्या तयारींत गुंतले असल्यामुळें गुलामांकडे कोणाचें फारसें लक्ष नव्हतें.

तो उठला. जवळच त्याचा शेजारी दोस्त तेंच काम करीत होता.

“ काय रे, काय चाललंय्? ” तो आल्यावर म्हणाला.

“ पण अगोदर मला सांग, काम सोडून येऊन मार खायचें आहे का तुझ्या मनांत? ” दोस्तानें विचारलें.

“ अरे, कोण पाहातो आहे? सर्व अधिकारी आपल्याच रंगांत आहेत. जसं त्यांचंच लग्न आहे बेट्यांचं? ”

“ पण तुला लेका नरोटीच मिळणार! ”

“ ती टळते नशिबाची. पण एक गोष्ट करावी लागेल. तुझी तयारी आहे का? ”

“ कसली? सीझरच्या जागीं तूं किंवा मी...”

“ चूप. असं मूर्खासारखं बोलूं नकोस. ”

“ मुत्सद्यासारखाच आव आणतोस कीं... ”

“ हूं...”

“ पण, माझाच दोस्त तूं. तुला काय माझ्यापेक्षां जास्त शिंगं आहेत? ”

“ माझं म्हणणं असं, कीं...” तो सांगूं लागला, “ आपण इथून पळून जाऊं या. ”

“ अगदीं शहाणपण! हातीं लागल्याबरोबर आपलं मरण! वा! सुंदर! अरे, निदान उत्सवाची मिरास तर पाहा. कशाला मरतोस? ”

“ तीच पाहात राहा जन्मभर! ” तो तिरस्कारानें उद्गारला.

“ मग काय, मरूं म्हणतोस? ” मित्रानें विचारलें.

“ मेलास तरी तुझ्यासाठीं कोण रडणार आहे? या साऱ्या रोम शहरांत फटक्यांशिवाय विशेष बक्षीस आपल्याला कुणीं दिल्याचं

आठवतं तुला कधीं ?"

त्याचा मित्र थोडा विचारांत पडला. त्यालाहि त्या एकंदर हीन परिस्थितीचा वीट आला होता; पण पळून जाण्याचा मार्ग प्रथम त्याला विचित्र वाटला. किंचित् थांबून त्यानें विचारलें,

"बरं, आपण पळून गेलों तर हातीं नाहीं का सांपडणार ?"

"नाहीं."

"हें कसं ?"

"जंगलांत लपून बसूं. झाडपाला खाऊं, नाहीं तर मरूं. निदान जंगलांत बिगारी काम करतां करतां रक्त तर ओकावं लागणार नाहीं ?"

"पहा बेट्या, नाहीं तर ऑफस् व्हायचं सारं..." तो हुरळून म्हणाला, "आणि तसं झालं, कीं उत्सवाच्या अगोदर आपलीच धिंड निघायची."

"नाहीं रे; तूं बेइमान होऊं नकोस म्हणजे झालं. शेवटपर्यंत असाच राहा. जंगलांत सख्ख्या भावासारखं राहायला हवं. इतर वेळीं भांडलों तरी हरकत नाहीं."

"बरं, मग तुला कुठें भेटूं ?"

"मला भेटूं बिटूं नकोस. उत्सवा सुरुं झाल्याच्या दुसऱ्या दिवशीं पळून तूं त्या खडकाच्या डाव्या कपारींत लपून बैस. मी तिथें येतों आणि मग ठरवूं."

तो त्या शेजाऱ्याजवळून धावतच पळत आला. आपल्या जागेवर येतांच त्यानें खणणें सुरू केलें.

। २ ।

सीझरचा विजयोत्सव ! सर्वत्र धुमधडाका. कोण कोणाची पर्वा

करतोय्! सर्व तयारी झाली. सैन्याची कवाईत. नृत्यगायनाचे जलसे. सुन्दर सुन्दर पोषाखांत हिंडणारे स्त्रीपुरुष. सर्व वातावरणांत बदल झाला होता.

सीझरचा हुकूम सुटला, "अँफी थिएटर्समध्यें गुलामांचीं द्वंद्वयुद्धं होतील. विजयी गुलाम स्वतंत्र होतील."

साठसत्तर हजार लोक तेथें जमणार. गुलामांच्या जोड्या पटांगणांत उभ्या राहाणार. एक गुलाम आपल्या जीवाची होड लावून दुसऱ्या गुलामाबरोबर युद्ध करील. एक मरणार. एक विजयी होणार! सीझरची, त्याच्या उमरावांची, विजयी सैन्याची व रोमच्या प्रजाजनांची घडीभर करमणूक. आणखी काय! त्या दिवशीं कित्येक गुलाम मारले जाणार होते. अँफी थिएटरमध्यें रक्ताचा सडा शिंपडला जाणार होता. कष्टून कष्टून संत्रस्त झालेले लोक शस्त्रांच्या जखमांनीं रक्तबंबाळ होऊन तडफडून तडफडून मरणार होते...

...रोमचा सम्राट मात्र हसणार होता!

ही परिस्थितीची एक बाजू झाली.

।३।

पळून जाण्याला संमति ज्यानें दिली होती त्या गुलामाला काय वाटलें? किंचित् आनन्द झाला त्याला. कां झाला हें मात्र त्याला कळेना. त्याला कांहीं सुचेना. त्याला कोणतीच इच्छा उरली नव्हती, कीं जिच्याकरितां तो आशेनें वाट पाहात राहील! सर्व इच्छा जळून भस्म झाल्या होत्या. त्याची विचारशक्ति इतक्या दिवसांच्या धसक्यानें डासळून गेली होती. ज्या कांहीं आशा आकांक्षा होत्या त्या साऱ्या पिचून

गेलेल्या होत्या. 'आपण स्वतंत्र होऊं' या शब्दत्रयाचा अर्थ त्याला कळत होता, अशांतला भाग नाहीं. आहे यापेक्षां निराळी परिस्थिति आली, कीं आपण स्वतंत्र झालों हीच त्याची कल्पना. पूर्वींचे दिवस त्याला आठवत. पण त्यांकडे आशेचा वेध लावणें त्याच्या आवाक्या-बाहेरचें होतें. हातांतली चिमणी भुर्रकन् उडाली म्हणजे ती ज्या दिशेनें उडाली तिकडे पाहात बसण्यापलीकडे दुसरें कांहीं न करतां येणाऱ्या असहाय जीवाप्रमाणें त्याची मनःस्थिति झालेली होती.

तो विचार करूं लागला. सीझरचा हुकूम आणि त्यामुळें मिळालेली स्वातंत्र्याची संधि! दोन्ही गोष्टी त्याला एकदम दिसूं लागल्या. त्याच्या कपाळाला आठी पडली. हातीं आलेली सुवर्णसंधि गमावून बसण्या-इतका तो मूर्ख नव्हता हेंच त्या आठीनें दाखवून दिलें जणूं!

'जिंकलास तर स्वतंत्र होशील. मेलास तर आनंदच आहे. त्या जंगलांत तरी मरणावांचून दुसरं कोणतं सुख मिळणार?' त्याच्या मनःश्चक्षूंसमोर हा वाक्यसमूह सारखा नाचूं लागला. जंगलांत मरण्यापेक्षां हा मार्ग कितीतरी सोपा होता. त्याची मनःस्थिति विचित्र झाली. शेजारी मित्राबरोबर अरण्यांत पळून जावयाची कल्पना त्याला आतां अव्यवहार्य वाटूं लागली. कुठें त्याच्यावर विश्वास ठेवतां? काय त्यानें आपल्याकरितां केलेलें आहे? पूर्वाश्रमींचा एक शेजारी ह्या नात्याशिवाय आपण त्याचे कोण लागतों? त्यापेक्षां...'

त्याची नजर किंचित् बावचळली. त्याला एकदम एक गोष्ट आठवली. त्याच्या मित्राचा एक हात कमजोर होता. एका हातानेंच तो काम करीत असे. एक खुनशी कल्पना त्याच्या मनांत आली. त्याची शून्याकडे रोखलेली दृष्टि इकडे तिकडे फिरूं लागली.

'युक्तीनें फसवून त्याला इथें आणायचं. द्वंद्व-युद्धांत आव्हान द्यायचं. त्याला मारायचं आणि — आणि मग आपण स्वतंत्र, अगदीं स्वतंत्र !

त्याचा विचार कायम झाला. पूर्वीपेक्षां त्याचे डोळे विस्फारले. मित्राला आणणें अगदींच सोपी गोष्ट. त्यानें फक्त जाण्याचें नाकारलें, कीं एकटें पळून जंगलांत राहाण्याची मित्राची तयारी नव्हती. त्याला मारणें ही त्याहूनहि सोपी गोष्ट. एक हात कमजोर असल्यामुळें मित्राचें बळ केव्हांहि कमीच असणार. इतर लोक द्वंद्व पाहून हसतील. तो देखील हसूं शकणार होता त्यांच्याबरोबर ! त्याचा उत्साह एकदम वाढला. आपण स्वतंत्र होणार ही कल्पनाच त्याला गोड वाटली. अंतःकरणाच्या आंतील आंतील भागांतून कोणीतरी नाजूक साद घातल्याचा त्याला भास झाला !

। ४ ।

खडकाची डावी बाजू ! तेथल्या एका खबदाडांत दोघे लपून बसले होते. दोघांचा कडाक्यानें वाद सुरू झाला होता. आवाज मात्र दबलेला.

" पण बेट्या, तूंच मला नाहीं का सांगितलंस ? आणि आतां तयार झालों तर...! "

" होय रे, पण आपण पळणार कसे ? जंगलांत सबंध जन्म काढावा लागेल तो ? "

" अं, राहूं. त्यांत काय ? पूर्वींच हा विचार करायला हवा होतास. अरे, पाखरं कशीं राहातात नि जगतात ? त्यांना कशी वाट सापडते ? आपण तर माणसं !..."

“मूर्ख आहेस झालं! चल. आपण दुसऱ्या दोघांशीं लढाई करून स्वतंत्र होऊं. सीझरचा हुकूम सुटला नव्हे का! मग उजळ माथ्यानें फिरतां येईल चांगलं याच रोम शहरांत! तुला तर लढतांहि येतं. तुझ्या वाडवडिलांनींदेखील चांगली तरवार गाजविली आहे.”

“मी नाहीं येत परत आतां. एकदा निघालों आहें.”

“जा मर! मी मात्र परत जातों व तुझी युक्ति कळवतों साऱ्यांना.”

तो परत फिरला. त्याचा शेजारी मित्रहि परत फिरला. त्याचा नाइलाज झाला. उगीच आपल्या मागावर शिकारी लावून घेण्याची त्याची इच्छा नव्हती. त्याला आपल्या विश्वासघातकी मित्राचा अतिशय राग आला आणि त्याच सूडाच्या भावनेंत तो रोमला आला.

। ५ ।

अँफी थिएटर लोकांनीं चिक्कार भरून गेलें होतें. सीझर येऊन बसला. भीषण व भयानक सूर कानीं पडूं लागले.

सर्व गुलाम बिचारे भीत भीत पुढें झाले. त्यांचीं गात्रें विगलित झालीं होतीं. स्वातंत्र्याच्या उन्हापेक्षां मरणाची सावलीच, त्यांचे करपलेले मुखवटे नीट दाखवीत होती. जुलमाचा रामराम झाला. नशिबाचे भोग पुरले गेले. मरणाऱ्यांच्या भयंकर किंकाळ्या हृदयें कापून पार जाऊं लागल्या!

ते दोघे एकमेकांवर खूप संतापले होते. परस्परांवर सूड घेण्याची त्यांची इच्छा!

“दगलबाज! घे आतां प्रायश्चित्त.” एक उद्गार.

“मूर्ख! मर आतां माझ्या हातून.” दुसरें उत्तर.

दोघांच्याहि चर्या भेसूर दिसत होत्या. डोक्यावरचे केस ताठ उभे राहिले होते. बटबटीत डोळयांतून रक्ताच्या ठिणग्या तिडकत होत्या !

त्यानें नेमका आपल्या दोस्ताच्या डाव्या कडेस वार मारला. एक करुण किंकाळी. दबका स्वर. आणि जमिनीवर रक्त सांडलें. तो भयानकपणें हसत होता. अधिकारी दचकला. आपल्या मित्राच्या मानगुटीवर बसून त्यानें आपले हात त्याच्या रक्तांत भिजवून घेतले.

"मला दगलबाज म्हणतोस ? घे, जा..."

सर्वांपेक्षां त्या दोघांचीच लढाई जास्त प्रेक्षणीय झाली. सीझर हसत होता. प्रेक्षकांनीं टाळ्या वाजविल्या.

त्याचे हात रक्तानें भरले होते. सर्वांगावर रक्ताच्या चिळकांड्या उडाल्या होत्या. त्याचा आनंद गगनांत मावत नव्हता.

कोणतीहि वस्तु जळून जाईल इतकी दाहकता त्याच्या त्या हसऱ्या नजरेंत भरली होती.

अधिकाऱ्यांची नजर त्याच्यावर रोखली गेली. त्यांचे चेहेरे फुलले. आपल्याला आज कांहीं विशेष पाहावयास मिळालें या आनंदांतच ते एके ठिकाणीं गोळा झाले.

"किती निर्दयपणें लढला तो ! फार क्रूर दिसतो. त्याला रक्ताची हिचक वाटत नाहीं." एक अधिकारी त्याच्याकडे पाहातच उद्गारला.

"हें पाहा, मला वाटतं..." दुसरा एवढेंच बोलून थांबला. त्याच्या मनांत कसलीशी कल्पना आली असावी.

"काय वाटतं ?..." तिसऱ्यानें विचारलें.

"कांहीं नाहीं. सहज एक जिज्ञासा म्हणून..." त्यानें आपली जिज्ञासा बोलून दाखविली, "माणसांशीं जर हा इतकी जबर

लढाई देऊं शकतो तर जनावरांशींहि देईल, नाहीं का ?"

"अरे होय, विशेष मजा येईल." चौथा अधिकारी त्या कल्पनेवर खूष होऊन म्हणाला,

"आणि उत्सव आहे तोंपर्यंतच हें घडलं पाहिजे. सीझरलाहि आवडेल तुझी कल्पना. मग ?"

"आणखी त्याला या नवीन पिंजऱ्यांतच सोडा बरं का !"

"ठीक आहे. करतों सारी व्यवस्था."

एक दोन अधिकारी लागलेच तेथून झटकले. पटकन् तीर मारून खालीं पाडलेल्या पांखराची तडफड पाहून पारध्याला होणाऱ्या आनन्दांत आणि त्याच्या उन्मादांत कांहींच फरक नव्हता. फक्त प्रमाण तेवढें मोठें !

। ६ ।

पहाटेच्या सुगंधी वाऱ्यानें सृष्टीचें पांघरूण बाजूला सारलें होतें. ती डोळे उघडून हसत होती. तिचें आरक्त वदन फुललें होतें.

रोमच्या राज्यांत सूर्यानें सोनें शिंपडलें होतें. स्वतंत्र आणि स्वच्छंद पांखरें रानाडोंगरांत केव्हांच उडून गेलीं होतीं. पहाटेचा गजर थांबला होता. रोम शहर उठून कामास लागलें होतें.

क्रूर श्वापदांचे पिंजरे उघडले गेले. रात्रभराची घाण त्यांत भरली होती. मांसाची गाडी आली. जिकडून तिकडून आरोळ्या फुटल्या.

त्या सिंहाचा पिंजरा उघडला गेला. रक्तामांसाचे गोळे इतस्ततः पडले होते. हाडांचीं कांडकीं माशांनीं बुजबुजून गेलीं होतीं. कोंडलेला वनराज त्या पिंजऱ्यांतच कोवळीं किरणें आंगावर घेत इकडून तिकडे फिरत होता.

एक छिन्नविच्छिन्न झालेलें डोकें तेथेंच पडलें होतें. रस्त्यांत आल्यामुळें पुढचा पंजा मारून सिंहानें तें बाजूला फेकलें व स्वतःच्या येरझारा तशाच सुरू ठेवल्या.

एका छोट्या पिंजऱ्यांत सिंहाला बोलावल्यानंतर नोकर त्या मोठ्या कठड्यांत शिरला. त्या रक्तामांसाच्या चिखलाकडे पाहून तो किंचित् थांबला. कोपऱ्यांत पडलेलें शीर त्यानें काठीनें उलटें सुलटें केलें व तो आपल्या कामास लागला.

तो मुखवटा त्या गुलामाचा होता. त्याच्या देहाच्या अन्नानें एका क्रूर श्वापदाची भूक तहान शमली होती. त्याचा आत्मा केव्हांच निघून गेला होता.

त्या शेजारी मित्राचें प्रेत खडकाच्या उभ्या बाजूला फेकलें गेलें होतें. त्यावर गिधाडें जमावयास सुरुवात झाली होती. त्याचेंहि शीर असेंच कोठेंतरी पडलें होतें !

दोघेहि स्वतंत्र झाले होते. सुटले बिचारे !

पक्षी स्वतंत्रपणें भराभर जंगलाकडे जात होते.

अगदीं थवेच्या थवे, थवेच्या थवे !

नागपूर
१८.१२.३४
सायंकाळीं ७ वाजतां

## ।६। आ म चा रा जा ।

कांहीं विशेष प्रसंगींच अशा गोष्टी घडत असतात हें जाणून देखील प्रत्येकजण तेथें त्या रस्त्यावर गेला, कीं थबकत असे. मुद्रेवर उमटलेला प्रश्न एकदम विचारीत सुटायचा, कीं हें आहे तरी काय ? कोण येणार आहे आज ? कसली तयारी सारी ही ?

तसें म्हटलें तर ठराविक ठशाचीच गोष्ट होती ती. तोफेची सलामी झाली, कीं त्या आवाजावरून आज एखादा महाराजा आला असेल हें ज्याप्रमाणें लहान मुलगा देखील जाणूं शकतो, त्याचप्रमाणें कंपौंडाच्या दगडासारखे रस्त्यावर उमे राहिलेले काळे पोलीस पाहूनहि असाच अंदाज प्रत्येकाला बांधतां येत होता.

त्या चौरस्त्यावर सक्त पहारा होता. समोरून येणारा एक आणि त्याला काटकोन करून कापून जाणारा दुसरा असे दोन्ही रस्ते पोलिसांनीं अडविले होते. कोणालाहि त्या रस्त्यावरून जाणें शक्य नव्हतें. कारण त्या रस्त्यानें राजाची स्वारी जायची होती व एका जीवाच्या संरक्षणासाठीं हजारों जीवांच्या भिंती केलेल्या दिसत होत्या.

एखादा आंधळा, लंगडा भिकारी जरी त्या वाटेनें जायला लागला तरी सुद्धा लालपट्टीचा जमादार त्याच्या बेचाळीस पिढ्या उजवून

धक्के मारून त्याला काढून लावीत असे. "लेईये काबुली अंगूर ऽऽ" म्हणून ओरडणारी एकादी फाटक्या आंगाची बाई देखील तेथें जायला धजत नव्हती. तिच्यापासूनहि राजाला भीति होती ?

परंतु तें तसें नसावें ! सिद्धार्थ ज्या रस्त्यानें मिरवीत जाई त्या रस्त्यानें त्याच्या दृष्टीला जीवनाची मेलेली बाजू पडूं नये म्हणून त्याचा बाप काळजी घेत असे; न जाणों, लाडका सिद्धार्थ जगाचीं दुःखें हलकीं व्हावींत म्हणून राज्यत्याग करून संन्यास घेईल आणि त्यानें संन्यास घेतलाहि ! त्याला म्हणे एक मेलेला, एक जर्जर झालेला, एक खंगलेला, असे तीन म्हातारे दिसले आणि जीवनाची सावली ही अशी भुतासारखी भेडसावते याची त्याला जाणीव झाली !

परंतु असल्या गोष्टी ह्या राजाला कळून काय उपयोग ? आणि त्या कळणार तरी कशा ? रस्ता झाडलेला, काळाभोर. रूप पाहून घ्या हवें तर आपलें ! तारेच्या खांबाला टेकून बसलेला – 'अंधेको पैसा दे भगवान्' – करीत भीक मागणारा कंगाल भिकारी – पण तो देखील आज तेथें नव्हता.

ठरलेल्या वेळीं खाकी पोषाख चढवून वरिष्ठ अधिकारी देखरेख करायला आले. कितीहि जरुरीचें काम असलें तरी त्या वाटेनें जाणें मना होतें. रावसाहेब असो, रावबहादुर असो किंवा कोणीहि असो, रहदारी बंद !

लाखाच्या गोष्टी करणारा सर शेठ आपल्या हिरव्या मोटारींत बसून मर्दासारख्या मिशा वर चढवून चालला होता. नेमलेल्या कक्षेंत मोटार येतांच एकदम अडविली गेली. ब्रेक दाबल्याचा खर्र्रखस् आवाज आणि सर शेठला एकदम धक्का पोचल्यानें त्याची झालेली संतप्त मुद्रा...

तथापि विचारतो कोण ? एक पंधरा रुपड्यांचा काळा डगलेवाला पुढें झाला, “ यह रास्ता बंद है, राजे साब जानेवाला...” शेठजीची मिशी खालीं पडली. दोन फर्लांगावरूनच मोटार मागें वळली.

। २ ।

त्या रस्त्यापासून मोटारीच्या शिंगाच्या आवाजावर असलेल्या एका तिमजली इमारतीच्या गच्चीवरून एक भरलेल्या उंचीचा पुरुष तीक्ष्ण नजरेनें खालीं पाहात होता. त्याच्या मनांत खूपसा मोठा विचार धुमाकूळ घालीत असावा आणि त्यांतून सुटण्याचा प्रयत्न करीत असतांना तो त्या जाळ्यांत अधिकाधिक गुंतून पडावा अशी त्याची मनःस्थिति दिसत होती. एक प्रकारची अधीरता त्याच्या मुद्रेवर आढळून येत होती.

रुंदशा खादीच्या पंचाचा अर्धा कासोटा मारून समोरचा पदर नुसताच खोचलेला, आंगांत बिनागळ्याचा सदरा, त्यावर एक साधासाच कोट, डोक्यावर कोठेंहि ठेवलेली दोन बोटांची टोपी-त्याच्याकडे पाहिलें, कीं वाटे, या गांधीनें साऱ्या लोकांना हें असें पागल बनवून ठेवलें आहे !

दिमाख मात्र मुरला नव्हता त्याचा ! ताठा तोच कायम ! अभिमान तसाच ! उभें राहाण्याची ती ऐट म्हणजे एखाद्या उंच डोंगराच्या तुटलेल्या कड्यावर उभें राहून चौफेर डोळा दाखविणाऱ्या वनराजासारखी. आव्हान द्यायचें तें देखील साऱ्या जगाला !

पाहातां पाहातां त्याची नजर त्या चौरस्त्यावर खिळली. त्याच्या कपाळावर किंचितशा रेषा उमटल्या.

" कसली तयारी आहे रे ही ?" जवळच उभ्या असलेल्या स्वयंसेवकाला त्यानें विचारलें.

" त्या वाटेनें महाराजे जायचे आहेत म्हणून पहारा."

" मग चारहि वाटा बंद झाल्या कीं काय ?..."

" अंहं, फक्त दोनच. बाकीच्या आहेत, पण..." स्वयंसेवक अडखळत म्हणाला.

" ठीक आहे ना ? चला तर मग..."

एकेक पाऊल ठेक्यानें टाकीत त्यानें खालीं उतरावयास सुरुवात केली. बाहेर एक सुंदरशी लालवट पिवळी अशी शीड पाडलेली मोटार उभी होती. तो आंत जाऊन बसतांक्षणींच त्यानें टोपी काढून ठेविली. किंचित् रक्तिमा असलेला त्याचा गोरापान चेहेरा पिवळ्या धमक सोन्याच्या आंगठींत बसविलेल्या खड्यासारखा राजसवाणा दिसत असे तो त्या मोटारींत !

" भर्र्र..." अगदीं हळूच आवाज झाला. मोटारीचें शिंग वाजलें आणि वेग सुरू झाला...

ज्या जागेपासून सर शेठजींची गाडी अडविली गेली होती त्या जागेजवळ मोटार येऊन थडकली. लांब आवाजांत पुनः एकदा मोटारीचा कर्णा वाजला. हेतु हा, कीं असेल कोणी रस्त्यांत तर बाजूला व्हावें ! एकदम एक शिपाई पुढें आला आणि...

...ती मोटार, त्यांतला पुरुष !...

त्याचा हात तसाच राहिला. त्याच्यासमोरून सर्रदिशी मोटार निघून गेली. त्याचें मस्तक किंचित् नमलें. परंतु...

त्याला कसली आठवण झाली देव जाणे ! शिपाई ताठ उभा राहिला.

जेवढी करतां येईल तेवढी त्यानें आपली नजर करडी केली आणि शिटी फुंकून पुढच्या पोलिसाला ती मोटार अडविण्यास खूण केली !

समोरचा पोलीस ! तो देखील त्याचाच भाऊ ! प्रथम आश्चर्य, नंतर नम्रता, नंतर बावरलेली मनःस्थिति, नंतर करडा चेहरा, पुनः शीळ आणि पुढच्या पोलिसाला खूण !

एक, दोन, तीन...! रुळाच्या दुतर्फा रांगेनें उभ्या असलेल्या बाभळीच्या झाडांना मागें टाकीत अग्निरथ रस्ता कापीत जावा तशी ती फर्लांगभर अंतर धावून त्या चौरस्त्यावर जाऊन पोचली आणि मग...!

" ही मोटार आली कशी इथपर्यंत ? मेलेत कीं काय हरामजादे ?" तेथें उभ्या असलेल्या छोट्यामोठ्या ऑफिसरांच्या काळजांत हा प्रश्न जाऊन भिनला. कोणाची मोटार ही ?...

दुसरा क्षण ! गोंधळलेली मुद्रा बदलून, आतां दुसरा उपाय नाहीं असें जाणणाऱ्या एका शीख ऑफिसरानें हात दाखविला. ती वेगवती थांबविली गेली.

तो पुरुष अगदीं साध्या भावानें त्या सर्वांकडे पाहात होता. सर्कशींत शिकवून तयार केलेल्या जनावरांकडे पाहातांना ज्या प्रकारचें सानुकम्प कुतूहल माणसाच्या मुद्रेवर दिसून येतें, तसलेंच कुतूहल ! दयाशील वृत्ति...

" काय आहे ? " शांतपणें प्रश्न विचारला गेला.

" भाईसाब, यह रास्ता थोडी देरके लिये बंद किया है " अगदीं नम्रपणें उत्तर.

" पण हा उजवा रस्ता मोकळा आहे ना ? "

" हां जी ?..."

" मग हाच माझा रस्ता आहे, अच्छा, वंदे मातरम्..." मोटार चालू झाली.

त्या अधिकाऱ्याच्या ओठांवर आलेले शब्द तेथेंच विरले. भावनांच्या आवेगांत तो तसाच पाहात राहिला.

मघाशीं आलेली मोटार कोणी अडविली होती ? आणि आंत कोण बसलें होतें ?

" वह कौन है ?..."

" लोकसभाका सभापति..."

बऱ्या अधिकाऱ्यानें निबरपणें विचारलेल्या वरील प्रश्नाला शीखानें उत्तर दिलें. तो अजूनहि उजव्या रस्त्याकडे पाहात होता. ती पिवळी आणि किंचित् लाल दिसणारी वेगवती भरधाव पुढें जात होती. कितीतरी वेळ तिचा सोसाटा ऐकूं येत होता....

...सूंऽऽऽ...

सुवर्णशिबिकेंत बसून जणूं काय कुबेराची स्वारी अनिर्बंधपणें मिरवीत होती !

भक्ति आणि भावना परमेश्वरानें प्रत्येकालाच दिल्या आहेत नाहीं ?

नागपूर
२५.१२.३५



# ।७। वस्तूचें मूल्य

।१।

एका मोठ्या परडीवर बरेंच स्वच्छ असें ओलें धोतर घडी करून टाकलेलें होतें. त्यावर एका कडेस फुलांचे हार होते. दुसऱ्या बाजूला फुलें पडलीं होतीं. भरगच्च भरली होती ती परडी !

फुलमाळी येऊन बसला. त्यानें गळपट्टी नसलेला रेशमी सदरा घातला होता. हाताच्या दोन्ही बोटांत गोल आंगठ्या होत्या. आल्या गेल्या ग्राहकाला तो फुलांचे पुडे बांधून देत होता.

"माळीदादा, फुलं द्या बरं..." एक सतरा अठरा वर्षांचा तरुण आला. माळीदादा दुसऱ्या गिऱ्हाइकांत गुंतला असल्यामुळें त्याला तेथेंच थांबावें लागलें.

त्याच बाजूला गुलाबाच्या तीन चार कळ्या ठेवलेल्या होत्या. अगदीं सुंदर, छान, ताज्या ! कोणालाहि त्यांच्याकडे एकदा डोळे भरून पाहिल्याशिवाय तेथून जावेंसें वाटेना. अर्ध्या अर्ध्या उमललेल्या, जणूं त्या आपल्याच आनंदांत मुसमुसत होत्या !

त्या तरुणानें चटकन् एक कळी उचलली. स्वतःच्या फुलांबरोबरच घेणार होता तो. त्यानें तिचा सुवास घेतला.

फुलमाळ्याची रागीट नजर त्याच्यावर रोखली गेली. तो चिडला. तो म्हणाला, " भले हो दादा तुम्ही! गिऱ्हाइकाकरतां राखून ठेवल्या आहेत त्या नि एकदम वास सुद्धा घेतलात् त्यांचा ? ठेवा खालीं, तुम्हांला काय ! "

तरुणानें स्वतःचा पुडा हातीं घेतला व तो निघून गेला.

। २ ।

ज्या गृहस्थाकरितां त्यानें त्या राखून ठेवल्या होत्या त्याला पाहातांच माळीदादा किंचित् हसला. " उशीर झाला साहेब बराच. कित्येकांच्या नजरेंतून वांचविल्यात् त्या. म्हटलं तुम्ही बडीं माणसं. तेव्हां..."

त्या कळया घेऊन प्रसन्न मनानें तो गृहस्थ निघून गेला.

बाईसाहेबांची नजर त्या कळयांकडे जातांच त्यांची कळी खुलली. कारकुनाला बोलल्यावाचून राहावेना. तो म्हणाला, " छान आहेत ना ? आज छोटेसाहेब अगदीं खुष होतील, नाहीं का ? आपल्याला पण आवडल्यात ना त्या ?"

" हो, खरंच सुंदर आहेत."

" फुलमाळ्यानें मुद्दाम राखून ठेवल्या होत्या. मी गेल्यावर तो तसं म्हणालाहि. "

" सुंदर आहेत खऱ्या, पण वासबीस तर घेतला नाहीं ना कुणीं ? नाहीं तर उगीच..."

" छे, छे, असं कसं होईल ! इतका संभावित गृहस्थ तो. त्यानें दिल्यान् त्या. अगदीं खात्रीचा आहे तो. "

" मग ठीक आहे. नाहींतर आपलं..."

" बरं, मी तरी कसा आणीन ? कालचीच गोष्ट पाहा ना !..."

बाईसाहेब कळ्या घेऊन आंत गेल्या !

। ३ ।

' कालची गोष्ट ' अशी—

छोटेसाहेब आणि कारकून सायंकाळीं फिरायला गेले होते. छोटेसाहेब असतील एकविशीच्या घरांत. हौशी होती स्वारी बरीच.

एका बागेच्या शेजारून जातांना एका दगडाजवळ त्यांना चारपांच गुलाबाच्या कळ्या दिसल्या. अगदीं सुंदर, छान, ताज्या, भरदार, किंचित् उमललेल्या. छोटेसाहेब त्या हौसेनें उचलून त्यांचा वास घेऊं लागले. कारकुनाचें लक्ष होतें. तो म्हणाला,

"साहेब, फेकून द्या त्या कळया. कुणीं वास घेतला असेल त्यांचा."

" नाहीं. किती सुंदर आणि ताज्या आहेत पाहिल्यात? आपल्या-सारखाच कुणीतरी फिरायला येणारा विसरून गेला असेल."

" पण साहेब, विश्वास ठेवायचा कसा ? विचारायचं कुणाला ? " कारकुनानें शंका उपस्थित केली.

" बरं, असूं दे ना त्या तशा. अजूनहि त्या सुंदर आहेत. काय हरकत आहे घ्यायला ? "

" छे, छे. आपल्याला काय सुंदर मिळवितां यायच्या नाहींत ? आपल्यासारख्यांना शोभत नाहीं हें असं. चला ! मी तुम्हांला अगदीं तशाच आणून देईन दुसऱ्या..."

ते पुढें गेले !

## व स्तू चें मू ल्य

त्या कळ्या तेथेंच पडल्या होत्या. त्यांचा विलोभनीय रक्तिमा, मोहक रंग, जिवाला ओढ लावणारा सुगंध, सारें सारें तेथेंच सुकून जायचें होतें का ? कीं...??

...आणि फिरून परत येतांना त्यांना त्याच जागेजवळ फुलमाळी भेटला. त्यानें छोट्या साहेबांना अदबीनें नमस्कार केला आणि बागेंत जाण्याकरितां तोंड फिरविलें.

त्याच्या परडींत गुलाबकळ्या होत्या ! त्यांकडे त्यांच्यापैकीं कोणाचेंच लक्ष गेलें नाहीं !

जगानें आपलीं मूल्यें बदललीं आहेत. फुलमाळ्याला जग महत्त्व देऊं लागलें आहे.

वस्तूचें मूल्य ठरविणारा हा एक नवा घटक निर्माण झाला आहे !

नरखेड
१९.६.३४
सकाळीं ९ वाजतां

## ।८।　　　सु ख

रावबहादुरांच्या पत्नी विमलाबाई दुपारीं सहज बाहेर ओसरीवर येऊन बसल्या. जवळच त्यांचें मूल खेळत होतें.

...त्यांच्या दाराशीं एक भिकारीण केविलवाण्या स्वरांत भिक्षा मागत होती. तिचें मूल तिच्या पुढ्यांत गुंडाळून पडलें होतें. ॥ १ ॥

...विमलाबाईचें मूल रडूं लागलें. त्यांची मुद्रा त्रासिक झाली. लागलीच दाईला हाक मारून त्यांनीं त्याला तिच्या स्वाधीन केलें.

...भिकारणीचें मूल रडूं लागलें. तिनें आपल्या मुलाला पोटाशीं धरलें. ॥ २ ॥

...दाईनें मुलाला सुंदरशा पाळण्यांत मऊशा बिछान्यावर निजवलें.

...भिकारणीनें आपल्या मुलाला वात्सल्यानें कुरवाळिलें. ॥ ३ ॥

...मुलाला उगा करण्याच्या उद्देशानें दाई त्याला हळू हळू थोपटून झोके देऊं लागली.

...भिकारणीचा मुलगा आईच्या पोटाशीं बिलगून स्तनपान करीत होता ! ॥ ४ ॥

...विमलाबाईचा मुलगा अजूनहि रडत होता.

...भिकारणीच्या मुलाचें तोंड दुधानें फेसाळलें होतें. ॥ ५ ॥

...विमलाबाईनीं सर्व पाहिलें. संतापून त्या बाईच्या आंगावर धावून गेल्या.

...भिकारीण केविलवाण्या स्वरांत भिक्षा मागूं लागली. ॥ ६ ॥

नागपूर
३.२.३५

## ।९। नवी आणि जुनी नीति [§]

माझ्या पुस्तकांत इतर पुस्तकांबरोबरच ‘ इसापनीति ’ पण पडली होती. तीच काढून आज मी चाळींत होतों. पांच सात गोष्टी वाचून होत नाहींत तोंच डोळ्यांवर झापड आली. दिवा बारीक करून मीं पुस्तक मिटलें.

तें स्वप्न उत्तर रात्रीचेंच असेल. त्याशिवाय मला इतकें स्पष्ट आठवणार नाहीं. तो स्वप्नांतला म्हातारा अजूनदेखील माझ्या डोळ्यांसमोर दिसतो.

त्याचें घर गांवाच्या एका बाजूला होतें. चांगलें प्रशस्त आणि मोठें. आवार अगदीं मोकळें. चारी भिंती चांगल्या मजबूत असल्या-मुळें त्याला कोणत्याच प्रकारची भीति नव्हती. त्याची सांपत्तिक स्थिति बऱ्यापैकीं होती. पूर्वजांचें धन त्यानें नीट राखण्याचा प्रयत्न केला होता. गांवच्या इतर पंचायतींत तो पडत नसे.

त्याला बायका दोन. एक वयस्क – म्हणजे त्याच्यापेक्षां आठदहा वर्षांनीं लहान. दुसरी तरुण – आतां उतार वयांत केलेली ! दोघींनाहि

§ फार दिवसांपूर्वीं दिवंगत झालेल्या इसापची क्षमा मागून !

एकमेकींशीं भांडण्याचें वस्तुतः कारण नव्हतें. दोघींचेहि मार्ग भिन्न. दोघीहि आपापल्या मार्गाशिवाय इतर पूसतपास करीत नसत.

दुपार झाली, कीं मोठी पाटलीण आंगणांत ओटीवर येऊन बसे व चार बायकांना पुराणांतील गोष्टी सांगत असे. पुराणांत असें आहे, अमुक हरिदासानें अमुक अमुक आख्यान लावलें होतें, वगैरेपासून सुरू करून ती चढत चढत सरळ मोक्षापर्यंत जाऊन येई. बिचाऱ्या शेजारणी अशिक्षित व अडाणी. त्यांना पाटलीणबाई म्हणजे ‘रामायण, महाभारतच’ वाटत !

पण हें महाभारत पतीच्या मात्र उपयोगीं आलें नाहीं. उतारवयांत त्याचें मन दुसऱ्या तरुण बायकोकडेच झुकायचें व तिच्या सहवासांत त्याला सुख वाटायचें. ज्ञानप्रदर्शनाच्या, पोथीपुराणांच्या तो फारसा वाटेस जात नसे. शिवाय उतारवय झालें तरी त्याचे अर्धे केस अजून काळेच होते. त्यामुळें दोघांचें पटत नसेच असें नव्हे. आपलें कामापुरतें पटायचें !

त्या तरुण पत्नीची आणि गांवांतील एका मास्तरणीची चांगली मैत्री होती. त्यामुळें तिला ‘महिला’ नियमित वाचायला मिळायची. शहरांतील शाळेंत ती दोन वर्षें जाऊन आलेली असल्यामुळें तिच्यांत एक प्रकारची श्रेष्ठ भावना आली होती. त्यांतून लाडाची म्हातारपणची बाईल ! ‘मेल्या पुरुषांची’ संगति तिला सदान्कदा बरी वाटत नसे. मोठी पाटलीण बायकांच्या घोळक्यांत व्याख्यान देत बसली, कीं ही वर जायची आणि मग ती बरी, कीं तिचीं मासिकें बरीं. तिला इंग्रजी चांगलेंसें उमगत नसल्यामुळें ती आपली तहान मराठीवरच भागवी. ‘किर्लोस्कर’, ‘रम्यकथा’, ‘पारिजात’, ‘सकाळ’,

‘ शामसुंदर ’, ‘ प्रतिभा ’, ‘ महाराष्ट्रशारदा ’ इत्यादि सर्व आधुनिक वृत्तपत्रें आणि मासिकें तिच्या खोलींत तयार असत. तिची मास्तरीण मैत्रीण तिला बरींच पुस्तकें आणून देई. कधीं मधीं ‘ पुरुषार्था ’चाहि एखादा अंक ती चाळीत असे. नियमित नाहीं. तिचा ‘ बायकार्थ ’ वेगळा असल्यामुळें त्या मासिकाची तिला जरूर भासली नाहीं. सूर्यनमस्कार वगैरेसारखे विषय अर्थातच तिच्या कक्षेबाहेरचे होते.

असा क्रम बरेच दिवसांपासून सुरू होता. म्हातारा जोंवर खंबीर होता तोंवर घरचें वातावरण पूर्णपणें शांत होतें – अगदीं वाळूसारखें! दगड टाकला तरी उत्तर यायचें नाहीं, प्रतिध्वनि उमटायचा नाहीं!

पण दिवस काय सारखे असतात ? आधि व्याधि कुणाला सुटल्या आहेत ? उतारवयांत त्या कुणाला जर्जर करीत नाहींत ? बिचाऱ्या म्हाताऱ्याचें वर्चस्व घरांत उत्तरोत्तर कमी होत चाललें. दोघींचा वरचष्मा घरांत सुरू झाला.

कारभार मात्र मोठी पाटलीणच पाहात असे. धाकटीला त्याबद्दल कधीं फिकीर वाटली नाहीं. तिच्या तारुण्याची मोहिनीच अशी कांहीं होती, कीं म्हातारा तिच्यावर अगदीं खूष! तिनें त्याचें मन ओळखलें होतें. त्याचीहि निराशा होत नसे.

तिचें वाचन मात्र सुरू होतेंच. म्हातारा तिच्या खर्चाकरितां कमी करीत नसे. त्यामुळें ‘ निर्भीड ’ वगैरे पत्रेंदेखील तिला वाचायला मिळत. निरनिराळीं आधुनिक पुस्तकें ती अगदीं व्ही. पी. नें मागवीत असे. तिची दृष्टि फाकल्यासारखी तिला वाटे. ज्ञानाचा केवढा प्रभाव!

या सर्व गोष्टींचा परिणाम मोठ्या पाटलिणीवर फार झाला. तिला हा फुकटचा वरचष्मा सहन झाला नाहीं. नवऱ्याचें मन आपल्याकडेच

ओढून घेण्याचा ती प्रयत्न करूं लागली. तिनें देवाला नवस करणें सुरू केलें. तिची आंगकाठी वातुळ होती. तिला विशेष धावपळ जमत नसे. तरी स्वतः जातीनें नवऱ्याचें काम करायची ती दक्षता बाळगूं लागली. निदान तिनें तसें भासविलें तरी. पुराणांतील गोष्टींनीं ती त्याच्यावर आपली छाप पाडण्याचा प्रयत्न करूं लागली. त्याचे कपडे वगैरे पूर्वीपेक्षां व्यवस्थित दिसायला लागले. पण व्यर्थ! आपल्या तरुण बायकोला आपण सुंदर कसे दिसूं याचाच तो प्रयत्न करूं लागला. त्यामुळें मोठ्या पाटलिणीच्या आंगाचा तिळपापड होऊं लागला.

शेवटीं तिला एक युक्ति सुचली. सर्व उपाय थकले असें तिला वाटलें. अखेरचाच प्रयत्न. म्हातारा दिसतो त्यापेक्षां अधिक म्हातारा दिसावा व अखेर त्या तरुणीनेंच नालायक म्हणून त्याचें नांव टाकावें अशी तिनें शक्कल काढली. तरुण बायकोच्या आवडीप्रमाणें म्हातारा आतां केस ठेवूं लागला होता. मोठी पाटलीण त्याचे केस रोज विंचरून देत असे व तसें करतांना त्याला नीतीच्या, धर्माच्या कथा सांगून भुलविण्याचा प्रयत्न करी आणि...

...आणि हळूच त्याच्या डोक्यावरील शिल्लक असलेले काळे केस उपटून टाकी!

प्रथम प्रथम गोष्टींच्या नादांत म्हातारा जरी अगदीं स्वस्थ बसलेला असे तरी पुढें डोक्याची आग व्हायला लागल्यावर तो संतापून आकांडतांडव करूं लागत असे. त्याच्या आवाजानें धाकटी पाटलीण बाहेर येई आणि मग काय?...

तिच्या तोंडाचा पट्टा सुरू होई. नवऱ्याला तर ती फडाफडा बोलेच पण वडील सवतीचेहि वाभाडे काढायचें सोडीत नसे....

...आणि शेवटीं सात्विक संतापाच्या भरांत ती त्याच्या डोक्यावरील पांढरे केस उपटायला सुरुवात करी.

बिचारा म्हतारा...!

असे प्रसंग बरेचदा येत आणि म्हाताऱ्याची चांगली... !

"अरे, झोपेंत हसायला काय झालं ? नीट उठून बैस बरं ?" मीं डोळे उघडले, तेव्हां आई माझ्या खाटेपाशीं दिवा घेऊन उभी होती !

नागपूर
७.१.३५
सकाळीं ६ वाजतां

# ।१०। अ म र वे ल ▌

।१।

" तुला तरी वाटतं किनई असं ? "

" वाटतंय खरं, पण पुष्कळ गोष्टी अशा असतात, कीं त्या पाहाणाऱ्यालाच दिसतात व ऐकणाऱ्यालाच ऐकूं येतात." मीं उत्तर दिलें.

" तें खरं रे, पण त्यांचं जर प्रेम होतं तर मग रविकान्तनें लग्न कसं केलं ? "

" काय हरकत आहे ? आपल्या जीवनांत हवी असलेली गोष्ट जर आपल्याला मिळाली नाहीं तर वाईट वाटून घेऊन रडत बसण्यांत काय अर्थ आहे ? "

---

**अमरवेल** : एक वेल, जिला मूळ नसतें. झाडावर टाकल्यास त्या झाडाचें शोषण करून स्वतः जगते. झाड सूकून जातें. खालीं ' रहिम ' कवीचा दोहा देत आहें—

> **अमर बेलि बिन मूल की प्रतिपालत है ताहि**
> **रहिमन ऐसे प्रभुहिं तजि ढूँढत फिरियै काहि ॥**

**अर्थ**—विनामुळाच्या अमरवेलींचें प्रतिपालन देखील ईश्वर करतो. अशा प्रभूला सोडून मी इतर कुठें शोधत फिरूं ?

---

" परंतु त्यांच्या लग्नाला आडकाठी तरी कोणती होती ? "

" तिच्या बापाची इच्छा ! त्या वेळीं..."

" मग आत्तांच असं दोन तीन वर्षांत काय झालं ? रविकान्तनें सिंधूशीं सुखाचा संसारहि केला. त्याला दोन मुलं पण झालीं आणि आतां हें मध्येंच..."

हें कोडें त्याला एकट्यालाच पडलें नव्हतें, पुष्कळांना जरा विचित्र वाटलें. बाबासाहेबांनीं स्वतःची इतकी शिकलेली, सुंदर आणि हुशार मुलगी रविकान्तला दिली कशी ? आणि तीहि त्याला दोन मुलें असतांना ? दोन वर्षांपूर्वीं याच बाबासाहेबांनीं तिला खूप खूप शिकवायचें म्हणून तिचें लग्न लांबणीवर टाकलें होतें आणि आतां एकदमच...!

" हीच रे ती मुलगी ! " टांग्यांतून उतरत असलेल्या मुलीकडे बोट दाखवून तो म्हणाला.

" यंदा पहिल्या वर्गांत पास झाली ती का ? " दुसऱ्यानें विचारलें.

" हं ! नि अशी तशी नाहीं, संस्कृतमध्यें प्रावीण्य मिळविलं तिनें आणि शिवाय आपल्या कॉलेजांतून पहिलं बक्षीस मिळालं तें वेगळंच. "

" मग आतां काय, बी. ए. मध्यें तर अगदीं..."

" अरे, आतां कसचं कॉलेज ! झालं आतां. लग्नाच्या भानगडी मागं लागल्या म्हणजे..."

" असंहि आहे का ? म्हणजे लग्नाकरतांच होतं वाटतं हें सारं ? इतक्या हुशार मुलीला निदान बी. ए. तरी करून घ्यायचं होतं. नाहीं का ? "

" अरे अगदीं तुझ्यासारखाच विचार होता तिच्या बापाचा. तो तर तिला परदेशांत पाठवणार होता शिकायला. "

" मग फिसकटलं कुठें ? कुणावर प्रेम वगैरे बसलं होतं वाटतं बयाचं, कीं दुसरा कुणी तिच्यावर प्रेम करायला लागला ? झालं काय ? "

" बेट्या, एकाचंच प्रेम नव्हतं. सुंदर आणि हुशार मुलीवर कुणाचं प्रेम बसत नाहीं ? म्हणून तर तिच्या बापानें तिला काढून कॉलेजच्या बाहेरच्या तरुणाशीं तिचं लग्न केलं ! ज्याच्या पदरांत पडली तो भाग्यवान दिसतो बेटा..."

" तें असो रे. त्याचं काय करायचंय् आपल्याला. आपल्या कॉलेजांत कांहीं प्रकरणं झालीं का ? "

" तुला काय पंचाईत त्याची ? "

" कां ? अगदीं पाठच्या भावासारखा कड घेऊन बोलतो आहेस तिची. काय विचार आहे राजश्री ? "

" लेका मन्या..."

इतक्यांत तासाची घंटा झाल्यामुळें त्यांना झाडाखालून उठून क्लासला जावें लागलें व तें बोलणें तितकेंच राहिलें.

। २ ।

काय असेल तें असो पण लतिकेनें लिहिलेलीं तेवढींच पानें बाबासाहेबांना दिसलीं. मग तिचा उद्देशच तसा होता किंवा काय नकळे. बाबासाहेबांनीं तीं वाचलीं...

" लोकांना वाटतं मी इंटर पास झाल्यें; पण मला तो आनंद अनुभवतां येतो का ? त्या दिवशीं कॉलेजांत एवढा गौरव झाला

माझा. पण मला काय वाटलं ? दोन वर्षांपूर्वीची मी असत्यें तर मला खात्रीनें आनंद झाला असता.

" दोन वर्षांपूर्वी बाबांनीं माझ्या लग्नाच्या गोष्टी केल्या नि लागलीच बंद केल्या. मला त्या दिशेनें विचार करावयास लावलं नि एकदम माझी निराशा केली. मला सुद्धा वाटत होतं बाबा म्हणतात तसं, कीं आपण खूप खूप शिकावं म्हणून. पण तें केव्हां ? लहानपणापासूनच्या आशांना पालवी फुटायचा प्रसंग बाबांनीं आणायचा नव्हता. रविकान्तचं नांव काढायचं नव्हतं. आमच्या बाळपणींच्या आठवणींचा गोडवा आम्हांला आठवूं द्यायचा नव्हता. अगदीं ओठीं लावलेला पेला ओढून घ्यायचा नव्हता !

" होईन, मी उद्यां बी. ए. होईन. पण माझं मन निवेल का ? सगळं कांहीं मी मनावेगळं करूं शकलें असत्यें नि तसं मीं केलं पण होतं. रविकान्तचं लग्न झालं तेव्हां मी नाहीं का हसत खेळत सारं निभावून नेलं. सिंधूताईबद्दल माझ्या मनांत कांहीं तरी आलं का ?

" सिंधूताई आपला संसार इतक्या लवकर अस्ताव्यस्त टाकून जातील असं कुणाला वाटलं नाहीं. सुधाकर आणि विमल यांच्यावर गाईचं दूध पिण्याची पाळी इतक्या लवकर येईल असं कुणीं भाकीत केलं होतं का ?

" लोक काय म्हणतील याचा नाहीं मी विचार करीत, पण मला अजूनहि वाटतं, कीं माझं आयुष्य सुखी करणं रविकान्तच्या हातीं आहे. सुधाकर नि विमलची जी आबाळ होते ती मला बंद करतां येईल. सावत्र मुलं म्हणून त्यांच्याबद्दलचा विपरीत भाव माझ्या मनांत येणं शक्य नाहीं. असं पाप माझ्या हातून होणं

अशक्य आहे. तीं माझ्या रविकान्तचीं मुलं. सिंधूताईलाहि मीं माझीच मानली होती.

" मला शिक्षण नको आतां. परदेश नको. कांहीं नको. मला काय हवं हें मीं स्पष्टच सांगितलं पाहिजे का ?

" पण हें बाबांना कसं सांगूं ? त्यांना कसं कळेल ? दोन वर्षांपूर्वी त्यांनींच रविकान्तची गोष्ट काढली होती. म्हणून आज देखील ते पुनः नव्यानें विचार करायला तयार होतील का ?

" आजपर्यंत सारं दिलं आहे बाबा तुम्हीं मला. पण हें तुम्हांला कसं सुचवूं ?

" बाबा, हें माझ्या नशिबीं नसलं तर एवढं तरी करा, कीं पुढें माझ्या लग्नाच्या भानगडींत पडूं नका. मी अशीच परदेशांत जाईन नि अशीच जिवंत राहीन. मला मग विवाहानें सुख लागायचं नाहीं. प्रेम ! माझ्या कॉलेजांतील कितीतरी मुलं माझ्यावर जीव टाकतात पण मला मात्र एका व्यक्तीशिवाय कुणाबद्दल कधींहि कांहीं वाटलं नाहीं नि वाटणं शक्य नाहीं ......"

बाबासाहेबांच्या मनांत या साऱ्या गोष्टी आल्या नव्हत्या असें नाहीं. पण मोठें ध्येय समोर ठेवल्यानें लतिका सर्व विसरून जाईल अशी त्यांची प्रामाणिक समजूत होती. ज्या दिवशीं त्यांनीं वरील पत्राचीं पृष्ठें वाचलीं त्या दिवसापासून त्यांना जरा विचारच पडला. लतिका त्यांची एकटीच मुलगी. तिच्याभोवतीं त्यांनीं आपल्या आशेचे धागेदोरे गुंतविले होते. वैभवाच्या कोंदणांत त्यांनीं तिला हिरकणीसारखी बसविली होती. पण आज केवळ लतिकेला वाटत आहे म्हणून हें भलतेंच कसें करावयाचें ? रविकान्तबद्दल प्रश्न नव्हता. पण त्याला दोन मुलें

आहेत ना ? आपल्या मुलीचें लग्न होत नाहीं असें थोडेंच आहे ?

पण वात्सल्यापुढें हें सर्व तर्कट ठरलें ! सर्व लतिकेच्या मनासारखें झालें !

। ३ ।

जाणारा जातो पण जगाचे सारे व्यवहार सुरूच असतात ! रविकान्तच्या संसाराचें असेंच झालें, पण थोड्या निराळ्या अर्थानें !

सर्व घर गजबजलें. हसण्याचा आवाज पुनः रस्त्यापर्यंत ऐकूं येऊं लागला. ' सावधान ' झाल्यापासून लतिकेनें रविकान्त, सुधाकर, विमल ह्यांची आईसारखी काळजी घेतली. ती सुखांत होती. ती हसे व तिला मधून मधून रडविण्याची सवय असलेल्या रवीनें त्या हसण्याचें नावीन्य कायम ठेवलें होतें. लतिकेला रडविण्यास त्याला खूप सायास पडत असें पण नाहीं. साधा छत्तिसाचा आंकडा पांच मिनिटांत त्याचें काम करूं शके. सायंकाळीं ढगाच्या पुंजक्याआड लपलेले प्रकाशकिरण त्याला दिसत. डाव्या हातानें तोंडावर आलेले केस सावरून रवी झोपीं जाई.

या दिवसांत लतिकेला जर कोणीं विचारलें असतें, कीं ' लतिका, स्वर्ग कुठें आहे ?' तर ती रवीकडे बोट दाखवून पळून गेली असती !

बोलतां बोलतां राम–सीता म्हणत, " अरे, रात्र संपली ? " खेळतां खेळतां रवि–लतिका वर्षे घालवीत होतीं !

कॉलेजमध्यें असतांना लतिकेची मैत्रीण तिला आवडतात म्हणून रोज सकाळीं गुलाबाचीं फुलें आणून देत असे. लतिकेला हर्ष होई. तीं फुलें आपल्या मैत्रिणीच्या बागेंतलीं आहेत हा विचार देखील तिच्या मनांत आला नाहीं. फुलें म्हणूनच तीं तिला आवडत.

...आणि सुधाकर व विमल या दोन गोड मुलांबद्दल प्रेम वाटण्याचें आणखी एक कारण म्हणजे दोघांचाहि तोंडवळा रवीसारखाच गोल व गोंडस होता. लतिकेच्या घरचीं हीं दोन पांखरें आपला चिमुकला खेळ कोठें तरी सांदीकोपऱ्यांत मांडून खेळत असत. तिच्या घरचा संपूर्ण आनंद त्यांच्या बाललीलांनीं भरलेला असे. येतां जातां लतिकेची नजर त्यांच्याकडे गेली म्हणजे आईचा स्वर्ग खालीं उतरत असे.

एकदम दूध तुटल्यामुळें गाईचें दूध कधीं कधीं त्यांना मानवत नसे. लतिकेचा जीव तीळतीळ तुटे. पण त्यांच्या "अनियतरुदितस्मितानें" ती सारें विसरून जाई.

दोन्ही दिव्यांचा प्रकाश दिवसेंदिवस जास्त पडत होता. त्या प्रकाशांत घरची दिवाळी बाराहि महिने साजरी केली जात होती.

। ४ ।

लतिकेच्या संसाराच्या बाबतींत तीन चार वर्षें उदासीन असलेला परमेश्वर जागा झाला. त्यानें डोळे उघडले. विधाता आपल्या सिंहासनावर जाऊन बसला. त्यानें आपली स्मृति उजळ केली. जगाचा उद्देश — सुख आणि दुःख! दुःख आणि सुख! 'सुखाच्या समुद्रावर दुःखाचीं वादळें आणलीं पाहिजेत. दुःखाच्या काळरात्री सुखाच्या चंद्रानें तेजाळल्या पाहिजेत.' विधात्याचा हुकूम सुटला. त्यानें चित्रगुप्ताला हाक मारली. जगांतील पापपुण्याच्या खतावण्या तपासल्या. जगाकडे अर्थपूर्ण नजर फेकली व पुराणपुरुष 'योगनिद्रा' घेता झाला!

गोरीगोमटी, लुसलुशीत गालांची लतिका हसत होती. खूप खूप हसत होती.

माझा. पण मला काय वाटलं ? दोन वर्षांपूर्वींची मी असत्यें तर मला खात्रीनें आनंद झाला असता.

" दोन वर्षांपूर्वी बाबांनीं माझ्या लग्नाच्या गोष्टी केल्या नि लागलीच बंद केल्या. मला त्या दिशेनें विचार करावयास लावलं नि एकदम माझी निराशा केली. मला सुद्धा वाटत होतं बाबा म्हणतात तसं, कीं आपण खूप खूप शिकावं म्हणून. पण तें केव्हां ? लहानपणापासूनच्या आशांना पालवी फुटायचा प्रसंग बाबांनीं आणायचा नव्हता. रविकान्तचं नांव काढायचं नव्हतं. आमच्या बाळपणींच्या आठवणींचा गोडवा आम्हांला आठवूं द्यायचा नव्हता. अगदीं ओठीं लावलेला पेला ओढून घ्यायचा नव्हता !

" होईन, मी उद्यां बी. ए. होईन. पण माझं मन निवेल का ? सगळं कांहीं मी मनावेगळं करूं शकलें असत्यें नि तसं मीं केलं पण होतं. रविकान्तचं लग्न झालं तेव्हां मी नाहीं का हसत खेळत सारं निभावून नेलं. सिंधूताईबद्दल माझ्या मनांत कांहीं तरी आलं का ?

" सिंधूताई आपला संसार इतक्या लवकर अस्ताव्यस्त टाकून जातील असं कुणाला वाटलं नाहीं. सुधाकर आणि विमल यांच्यावर गाईचं दूध पिण्याची पाळी इतक्या लवकर येईल असं कुणीं भाकीत केलं होतं का ?

" लोक काय म्हणतील याचा नाहीं मी विचार करीत, पण मला अजूनहि वाटतं, कीं माझं आयुष्य सुखी करणं रविकान्तच्या हातीं आहे. सुधाकर नि विमलची जी आबाळ होते ती मला बंद करतां येईल. सावत्र मुलं म्हणून त्यांच्याबद्दलचा विपरीत भाव माझ्या मनांत येणं शक्य नाहीं. असं पाप माझ्या हातून होणं

अशक्य आहे. तीं माझ्या रविकान्तचीं मुलं. सिंधूताईलाहि मीं माझीच मानली होती.

" मला शिक्षण नको आतां. परदेश नको. कांहीं नको. मला काय हवं हें मीं स्पष्टच सांगितलं पाहिजे का ?

" पण हें बाबांना कसं सांगूं ? त्यांना कसं कळेल ? दोन वर्षांपूर्वी त्यांनींच रविकान्तची गोष्ट काढली होती. म्हणून आज देखील ते पुनः नव्यानें विचार करायला तयार होतील का ?

" आजपर्यंत सारं दिलं आहे बाबा तुम्हीं मला. पण हें तुम्हांला कसं सुचवूं ?

" बाबा, हें माझ्या नशिबीं नसलं तर एवढं तरी करा, कीं पुढें माझ्या लग्नाच्या भानगडींत पडूं नका. मी अशीच परदेशांत जाईन नि अशीच जिवंत राहीन. मला मग विवाहानें सुख लागायचं नाहीं. प्रेम ! माझ्या कॉलेजांतील कितीतरी मुलं माझ्यावर जीव टाकतात पण मला मात्र एका व्यक्तीशिवाय कुणाबद्दल कधींहि कांहीं वाटलं नाहीं नि वाटणं शक्य नाहीं ......"

बाबासाहेबांच्या मनांत या साऱ्या गोष्टी आल्या नव्हत्या असें नाहीं. पण मोठें ध्येय समोर ठेवल्यानें लतिका सर्व विसरून जाईल अशी त्यांची प्रामाणिक समजूत होती. ज्या दिवशीं त्यांनीं वरील पत्राचीं पृष्ठें वाचलीं त्या दिवसापासून त्यांना जरा विचारच पडला. लतिका त्यांची एकटीच मुलगी. तिच्याभोवतीं त्यांनीं आपल्या आशेचे धागेदोरे गुंतविले होते. वैभवाच्या कोंदणांत त्यांनीं तिला हिरकणीसारखी बसविली होती. पण आज केवळ लतिकेला वाटत आहे म्हणून हें भलतेंच कसें करावयाचें ? रविकान्तबद्दल प्रश्न नव्हता. पण त्याला दोन मुलें

आहेत ना ? आपल्या मुलीचें लग्न होत नाहीं असें थोडेंच आहे ?

पण वात्सल्यापुढें हें सर्व तर्कट ठरलें ! सर्व लतिकेच्या मनासारखें झालें !

। ३ ।

जाणारा जातो पण जगाचे सारे व्यवहार सुरूच असतात ! रविकान्तच्या संसाराचें असेंच झालें, पण थोड्या निराळ्या अर्थानें !

सर्व घर गजबजलें. हसण्याचा आवाज पुनः रस्त्यापर्यंत ऐकूं येऊं लागला. ' सावधान ' झाल्यापासून लतिकेनें रविकान्त, सुधाकर, विमल ह्यांची आईसारखी काळजी घेतली. ती सुखांत होती. ती हसे व तिला मधून मधून रडविण्याची सवय असलेल्या रवीनें त्या हसण्याचें नावीन्य कायम ठेवलें होतें. लतिकेला रडविण्यास त्याला खूप सायास पडत असें पण नाहीं. साधा छत्तिसाचा आंकडा पांच मिनिटांत त्याचें काम करूं शके. सायंकाळीं ढगाच्या पुंजक्याआड लपलेले प्रकाशकिरण त्याला दिसत. डाव्या हातानें तोंडावर आलेले केस सावरून रवी झोपीं जाई.

या दिवसांत लतिकेला जर कोणीं विचारलें असतें, कीं ' लतिका, स्वर्ग कुठें आहे ?' तर ती रवीकडे बोट दाखवून पळून गेली असती !

बोलतां बोलतां राम–सीता म्हणत, " अरे, रात्र संपली ? " खेळतां खेळतां रवि–लतिका वर्षें घालवीत होतीं !

कॉलेजमध्यें असतांना लतिकेची मैत्रीण तिला आवडतात म्हणून रोज सकाळीं गुलाबाचीं फुलें आणून देत असे. लतिकेला हर्ष होई. तीं फुलें आपल्या मैत्रिणीच्या बागेंतलीं आहेत हा विचार देखील तिच्या मनांत आला नाहीं. फुलें म्हणूनच तीं तिला आवडत.

...आणि सुधाकर व विमल या दोन गोड मुलांबद्दल प्रेम वाटण्याचें आणखी एक कारण म्हणजे दोघांचाहि तोंडवळा रवीसारखाच गोल व गोंडस होता. लतिकेच्या घरचीं हीं दोन पांखरें आपला चिमुकला खेळ कोठें तरी सांदीकोपऱ्यांत मांडून खेळत असत. तिच्या घरचा संपूर्ण आनंद त्यांच्या बाललीलांनीं भरलेला असे. येतां जातां लतिकेची नजर त्यांच्याकडे गेली म्हणजे आईचा स्वर्ग खालीं उतरत असे.

एकदम दूध तुटल्यामुळें गाईचें दूध कधीं कधीं त्यांना मानवत नसे. लतिकेचा जीव तीळतीळ तुटे. पण त्यांच्या "अनियतरुदितस्मितानें" ती सारें विसरून जाई.

दोन्ही दिव्यांचा प्रकाश दिवसेंदिवस जास्त पडत होता. त्या प्रकाशांत घरची दिवाळी बाराहि महिने साजरी केली जात होती.

। ४ ।

लतिकेच्या संसाराच्या बाबतींत तीन चार वर्षें उदासीन असलेला परमेश्वर जागा झाला. त्यानें डोळे उघडले. विधाता आपल्या सिंहासनावर जाऊन बसला. त्यानें आपली स्मृति उजळ केली. जगाचा उद्देश — सुख आणि दुःख! दुःख आणि सुख! 'सुखाच्या समुद्रावर दुःखाचीं वादळें आणलीं पाहिजेत. दुःखाच्या काळरात्री सुखाच्या चंद्रानें तेजाळल्या पाहिजेत.' विधात्याचा हुकूम सुटला. त्यानें चित्रगुप्ताला हाक मारली. जगांतील पापपुण्याच्या खतावण्या तपासल्या. जगाकडे अर्थपूर्ण नजर फेकली व पुराणपुरुष 'योगनिद्रा' घेता झाला!

गोरीगोमटी, लुसलुशीत गालांची लतिका हसत होती. खूप खूप हसत होती.

पण एक दिवस तिनें रडून दिलें! पुढेंहि सुखाच्या चंद्रासमोर आसवांच्या वाफेचे ढग सदोदित येत गेले!

बागवानानें बागेचें दार उघडलें. फुलांची परडी सावरली व सरावलेल्या हातानें फुलें तोडावयास सुरुवात केली. त्या दिवशीं त्याची नजर एका कोपऱ्यांत झाडाच्या आसऱ्यानें वाढत असलेल्या कोवळ्या वेलीकडे गेली. तिच्यावर त्याला दोन सुंदर फुलें दिसलीं. त्याचीं तीक्ष्ण नखें कच् कच् वाजलीं व वेलीस हिसडा देऊन तो पुढें गेला! कितीतरी वेळ ती वेल धक्क्यानें हालत होती.

आयुष्यांतहि असेच हादरे बसतात. सुखाच्या कळ्या कोण कधीं खुडून नेईल याचा कोणाला काय नेम सांगतां येईल?

गांवांत साथ पसरली. लोक कॉलऱ्यानें आजारी पडून पटापट मरूं लागले. लतिकेला साधें निमित्त झालें. मुलांना बरें वाटावें म्हणून शनिवारीं सर्व मंडळी सिनेमाला गेली होती. तेथें सुधा व विमा यांना तहान लागली. रविकान्तनें जवळच्या हॉटेलांतलें पाणी आणून दिलें. मुलें पाणी प्यायलीं. आईनेंहि दोन घोट घेतले. हेंच निमित्त झालें आणि त्या घरांतहि धावपळ सुरू झाली.

दैवाचा खेळ पाहा! त्या आजारांतून लतिका कशीबशी बचावली पण सुधाकर आणि विमल...! सर्व मानवी प्रयत्नांनीं त्यांच्या बाबतींत हार खाल्ली!

...आणि त्या दिवसापासून लतिकेच्या डोळ्याचा थेंब खंडला नाहीं. रविकान्तचे सर्व प्रयत्न विफल ठरले. तिचें मन रमविण्यासाठीं तो परोपरीनें झटे. चन्द्राच्या दर्शनानें समुद्राला भरती येई पण रविकान्तला ती नको होती. त्याला वाईट वाटे. केविलवाणा होऊन तो म्हणे,

" लते ..."

ती भानावर येई व पुनः त्याच्याकडे पाहूं लागे.

" नाहीं हो, सिंधुताई, मला सांभाळतां आलं नाहीं !"

दिवस जात होते. लतिकेच्या शोकानें पृथ्वी स्तंभित झाली नव्हती. असे प्रसंग तिनें अगणित पाहिले होते. लतिकाहि आपले व्यवहार करीत होती. खात पीत होती. हसत होती. फिरत होती. पण दिवसांतून एकदा तरी ती उदास, खिन्न होत असेच.

एक दिवस रविकान्त तिला बागेंत फिरायला घेऊन गेला. तीहि आनंदानें गेली. सारी बाग त्यांनीं पालथी घातली. तिला ती बाग फार आवडली. उल्हसित अंतःकरणानें दोघेंहि जाईच्या कुंजाखालीं बसलीं.

" लतिका, तुला फुलं हवींत का गुलाबाचीं ? आणूं मी तोडून ?"

" नको, तीं तिथेंच बरीं आहेत..."

भुर्रर्र...! वर जाईच्या झाडावर आवाज झाला. त्यांनीं वर पाहिलें. चिमणी भुर्रकन् उडून गेली व उडतांना तिच्या तोंडांतली लहानशी फांदी लतिकेजवळ पडली.

टपोरशा दोनच कळ्या होत्या तिला !

लतिकेनें ती फांदी उचलली व त्या कळ्या हळूच आपल्या पदरांत धरून ठेवल्या. रविकान्त दचकला. लतिकेच्या डोळ्यांत हसतां हसतां पाणी आलें.

" काय होतं आहे लता तुला ?"

" मला भीति वाटते. कुणी मोठ्यानें बोललं, कीं कसंसंच होतं. कुणाचं रक्त पाहिलं, कीं जीव धस्स् होतो. झाडाचीं फुलं तोडूं नयेत. पाप आहे मोठं..."

ती कांहींतरी बोलत होती आणि रविकान्त नुसता पाहात होता तिच्याकडे.

। ५ ।

जान्हवीवहिनी सकाळीं वेणी घालीत होत्या. सखूमावशी अगदीं सहज म्हणून उभ्या उभ्या फेरी टाकायला आल्या शेजारणीकडे.

" कां ? आज वेणी घालायला उशीरसा झालाय्,..."

" उठल्येंच हो जरा उशिरा आज. आमच्या लीलाबाई आजारी आहेत ना ? साऱ्या रात्रभर कार्टीनें झोप लागूं दिली नाही कशी ती..."

" हो ? काल मग गेल्या होत्यात का चैत्राच्या हळदीकुंकवाला पाध्यांकडे ? "

" तुमच्या मागूनच तर मी आल्यें. गौर छान सजविली होती नाहीं ? पण कांहीं म्हणा बाई, त्या फेण्या जरा काळ्याच आल्या होत्या नई ? "

" अहो, त्याबद्दल मीं मुद्दाम चौकशी केली — तेव्हां स्वयंपाकीण-काकू म्हणाल्या, कीं फेण्या कांहीं लतिकाताईंनीं केल्या नाहींत. दिवसभर त्यांना अस्वस्थ वाटत होतं म्हणे..."

" असं ? माझ्याशीं तर बाई चांगली बोलली. हसून स्वागत केलं, हळदकुंकू दिलं..."

" तें सारं खरं, पण काल गौर सजवायला त्यांनीं पेटींतील ठेवणीचीं खेळणीं काढलीं होतीं म्हणे. "

" बरं मग ? "

" त्यांत त्या मुलांचीं खेळणीं होतीं कांहीं. तीं पाहून म्हणे त्यांना भडभडून आलं. "

" अस्सं ! " जान्हवीवहिनी उपरोधानें हसल्या व म्हणाल्या, " मला वाटलं, कीं आणखी कांहीं कारण झालं होतं. "

" म्हणजे ? मी खोटं का सांगत्यें आहे ? "

" छे हो, तुम्हांला का खोटं म्हणायचं ? पण भारीच भोळ्या बाई तुम्ही. "

" ती कशी ? "

" अहो, हें असंच असतं ! तुम्हांआम्हांला दिसलं पाह्यजे ना ? कालच नेमकं तसं झालं नाहीं का ? होतीं मुलं तोंवर कसं वागवलं त्यांना हें आम्ही नव्हतों का पाहात ? अहो ही शिकलेली बया ! नवऱ्याला लग्नाआधींच मथवून ठेवला होता म्हणे ! पोरकीं पोरं गेलीं तीं सुखीं झालीं बिचारीं ! "

" असं कसं म्हणतां बरं ? "

" असं म्हणजे ? कितीहि झालं तरी सावत्र आई. मुलांचा छळच तो. वागण्या वागण्याच्या रीति असतात हो ! घातल्या पावसानें का कधीं पीक येतं ? सोंगं आहेत सोंगं बरं हीं...नीघ–नीघ, छे–छे, घातलंच बाई मांजरीनें दुधांत तोंड...वणवा मेला... "

जान्हवीवहिनींचे पुढचे शब्द स्वयंपाकघरांतून ऐकूं आले नाहींत !

प्रभु रामचंद्राच्या आयुष्याचा उन्हाळा करणाऱ्या परिटाचे वंशज या सुधारलेल्या काळांतहि आहेत एकूण !

...कीं अमरवेलीसारखी ही ' अपुण्या जनोक्ति ' देखील सुखवृक्षाचे जीवनरस शोषीत अक्षर राहाते ? ?

नरखेड
२८.६.३३
रात्रीं १–२० वाजतां

## ।११। मा णू स कां र ड तो ?

" किती धिप्पाड होता: पहाड जसा कांहीं."

" कांहीं नेम नाहीं बाबा कधीं काय होईल याचा."

" आकाश फाटलं त्या पोरीवर."

" दोन पोरं मागं टाकून गेला. काय करावं तिनें आतां ?"

" अजून बिचाऱ्यांचं अन्नालाहि तोंड लागलं नाहीं."

" ती पोरगी पाहा ना. तरणीताठी, काय विटंबना लिहिल्या आहेत बिचारीच्या नशिबीं देव जाणे."

" काय देवाचा न्याय !"

" बरं, भाऊसाहेब आतां हातपाय गाळून कसं चालेल ? लावा कांहीं व्यवस्था, बांधा कंबर."

" कसली कंबर बांधूं अण्णा ? अरे, तीच तर खचली."

" असं कसं ? नाना, तुम्ही जोशी वगैरे बोलवा. मी मडकं आणतों. प्रहर दिवस होऊन जाईल. मग..."

तो मरून दोन घटकाहि झाल्या नाहींत तर सारा गांव उलटला. सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. दोन दिवसांच्या आजारांत हा खतम झाला ! आपलें कसें होईल ? हा आजार कोणता ?

आवारभर गर्दी माजली. त्याची बायको आपल्या दोन पोरांना

पोटाशीं घेऊन स्वस्थ बसली होती. अशा दुर्धर प्रसंगीं रडावें लागतें याचीहि तिला शुद्ध राहिली नव्हती. ती आल्यागेल्याकडे टकमकां पाही. पोरांकडे पाहून हसे. आजूबाजूच्या बायांबद्दल शंका व्यक्त करी, कीं तुम्ही कशाला आलां ? झालें आहे तरी काय ?

प्रेतयात्रेची तयारी झाली. शिडी बांधणें झालें. चार लोकांनीं जड हातांनीं दोऱ्या कसल्या. खांदे देणारे सिद्ध झाले. बायकांच्या जमावांतून आक्रोश सुरू होता. आक्रंदन, हुंदके, कर्कश आवाज, छातीफोड !

" कसा गेला ? " सर्व म्हणत.

" पोरी, मागच्या जन्मीं कुणाचं सौभाग्य तुडवलं होतंस ? ये पिल्या, ये, रडूं नकोस..." सर्व बाया कळवळल्या.

ह्या अर्भकांना अर्धमेलें झाल्यासारखें वाटलें. कोणीहि त्यांना उचलून घेई. एका हाताचा आधार नाहींसा झाल्यावर हजार हातांनीं आपली सहानुभूति दाखविली ! असें तरी कां होतें ? पण पोरांना मात्र जणूं कांटे बोचत होते !

कलेवर उचललें गेलें. बायको टाहो फोडून जमिनीवर पडली. आतां तिला जाणीव झाली, कीं कांहींतरी झालें आहे ! आतां तिला वाटूं लागलें, कीं ज्याला आपण आपल्या हृदयान्तरीं जपलें त्याचा मागमूस देखील नाहींसा होणार आहे ! तिला एकदम मूर्च्छा आली. धैर्यमेरूंच्या डोळ्यांना पाझर फुटेल इतकें तें दृश्य द्रावक होतें. मरण ! कल्पना केली तरी तोंड काळें ठिक्कर पडतें. तेथें तर यमराजानें आपली लीला चालविली होती.

तिला शुद्धीवर आणावयाचे प्रयत्न सुरू झाले. पुरुष मंडळी

स्मशानीं गेलेली. बायकांनीं तिच्याभोवतीं घोळका धरला. एक जरी आक्रोश करूं लागली तरी हजारजणींचा त्यांत सूर मिसळत असे. जीव आला ! जीव गेला !

" कशीं सोन्यासारखीं पोरं आहेत ! "

" कौतुक तरी किती होतं त्याला ! रात्रंदिवस त्याचं मन त्यांच्यांतच असे. "

" चार दिवस आजारी देखील पडला नाहीं. संसार काय, तिला बिचारीला सेवाहि करतां आली नाहीं दोन दिवस ! कशी शुद्धीवर येईल ? "

" पोरं मागें आहेत ! "

" अग वहिनी, ती बाई पाहा कशी स्फुंदस्फुंदून रडते आहे. "

" कोण हो वन्सं ? "

" ती. त्या झाडापाशीं एकटी उभी आहे ती. "

" ती पांढऱ्या पातळाची ? "

" नाहीं ग, सडकेचं लुगडं आहे. उजळ चेहरा आहे. टळटळीत नाक डोळे आहेत. "

" पाहा, जीव कसा खालींवर होतो आहे तिचा. तिच्या डोळ्याची धार पाहा कशी अविरत..."

" हं ती ? कुणीतरी बहीणबिहीण असेल. आभाळाएवढा जीव गेला..."

" कुठली ग बहीण ? ती देशपांडे वकिलाची बायको नव्हे का ? "

" अंतःकरण कोवळं आहे तिचं. कुणी त्रास देऊं नये म्हणून वेगळी जाऊन उभी आहे. "

" हं, नि बाकीच्या बायकांसारखी उपदेश पण करीत नाहीं."

" वन्सं, चला बरं तिथें."

त्या तिच्याजवळ गेल्या. ती आणखी दूर सरकली. तिला वाटलें, आपल्याला मनसोक्त रडूं देखील देत नाहींत. त्या तेथें गेल्या आणि तशाच उभ्या राहिल्या. त्यांना देखील रडें कोसळलें.

तिची खात्री झाली, कीं ह्या आपल्याला त्रास द्यायला आलेल्या नाहींत. तिनें त्यांच्याकडे पाहिलें. त्यांनीं निमित्त शोधलें.

सुंदरवन्सं म्हणाली, " खरंच बाई, कसा प्रसंग ओढवला !"

" कशाला उकरून काढतां ? जिवापरी जीव गेला. आपण बसलों कर्मकपाळीं. त्याचं वर्णन तरी कशाला ? बायको कशी मासळीसारखी तळमळती आहे. पदराला बांधलेलीं पोरं..."

तिचें तें अर्धें वाक्य हुंदक्यांत विरलें. त्या दोघींनीं गळ्यांत गळे घातले. तेवढ्यांतहि तिनें कपाळाचें कुंकूं नीट आहे किंवा नाहीं हें पाहिलें आणि ती हुंदके देत बोलूं लागली,

" काळ वेळ कुणाला सांगून आलेली आहे ? रडूं नको तर काय करूं सुंदरबाई ! ही वेळ ! माय बहिणी, तिच्यासारखीच माझी दशा आहे ग ! दोन लहान लहान चिलींपिलीं...मन चिंती...देवा..."

तिनें हंबरडा फोडला. सर्वांना पुनः उमळून आलें व एकच आक्रोश सुरू झाला.

तिच्याकडे आलेल्या त्या दोघीहि आतां तिच्यासारख्याच विलाप करूं लागल्या. तें दुःख सर्वांनीं वाटून घेतलें !

हरदा

२९.९.३६

## ।१२। जीवन तयासी कोण घाली ?

उन्हाळ्यांत झाडांना पालवी फुटते तेव्हां त्यांना जीवन कोण घालतो ? तुकारामानें उत्तर दिलें, ' देव घालतो. ' जमिनींत पाण्याचे अनंत झिरपे असल्यामुळें तुकारामाचे बोल खरे वाटले...

पण जेव्हां जेव्हां मी या माणसाकडे पाहातों तेव्हां मला कोडें पडतें, कीं हा इतका आनंदी कसा ? याचें उत्तरदेखील मला कांहीं केल्या सापडत नाहीं. कारण, याच्या घरची परिस्थिति पाहिली तर अक्षरशः ' विटंबिती पोरें रांडा...' अशी आहे. रोगांनीं ग्रस्त झालेली बायको, जिच्याकडून कशाचीहि अपेक्षा करतां येत नाहीं. मानसिक आणि शारीरिक असें गृहसौख्य अगदीं शून्य ! तीन चार मुलें पण तीं मेलीं नाहींत म्हणूनच केवळ जगत असलेलीं ! घरीं सगळा हा असा थाट आणि नोकरी कोणती तर मास्तरची...!

मास्तरची नोकरी ! आठवड्यांतून सात दिवस समोर पडलेला वह्यांचा गठ्ठा ! हेडमास्तरांचें, इन्स्पेक्टरांचें, ज्याला शिक्षणाचें एक अक्षरहि कळत नाहीं अशा म्युनिसिपालिटीच्या भडभुंज्या मेंबरांचें व अध्यक्षाचें ' इन्स्पेक्शन ! ' मुलांच्या वागणुकीचे सप्तरंगी तक्ते ! रेकॉर्डस् ! ज्यांचीं नांवें उच्चारतांच अन्नपचन होईल अशा एकेक अव्यावहारिक शिक्षण पद्धति...!

# जीवन तयासी कोण घाली ?

...आणि मिळत असलेला पगार अवघा चाळीस एकेचाळीस !

तथापि हा माणूस सदा हसरा. हसतो तेव्हां वाटतें, मोतीं माणकें सांडलींत ! तें कृश शरीर हर्षानें सदैव पुलकित झालेलें असतें. ते डोळे दिवाळीच्या रत्नदीपासारखे सदैव सतेज दिसतात. मास्तर शाळेंत आले म्हणजे सगळी शाळा आनंदानें उच्चंबळूं लागते. मी जर अठराव्या शतकांतील लेखक असतों तर असेंहि वर्णन करायला कमी केलें नसतें, कीं त्याचें पाऊल शाळेच्या आवारांत पडलें, कीं बागेंतील सगळीं फुलें फुलतात !

हे आनंदाचे झिरपे याला कोठून मिळत होते ? देवाच्या घरून हा कोणतें अमृत पिऊन आला होता ? त्याचें मन कसें अगदीं तल्लख, हौशी, उल्हसित !

*　　　*　　　*

मास्तर शाळेंत आले. वर्गांतील सगळीं मुलें त्यांच्याभोवतीं जमलीं. कोणी त्यांचीं पुस्तकें पाहूं लागला. कोणी खिशांतील खडू पळविले. कोणी नुसता त्यांच्या आंगाला हात लावून ते आपलेच मास्तर किंवा नाहीं याबद्दल खात्री करून घेतली. शिस्तीच्या एकाहि तत्त्वाला संमत नव्हता हा प्रकार. पण मास्तर म्हणत, " आतां या वयांत मी कसली शिस्त शिकणार ? मला कसलं जमतं तें. हें तर माझं घर आहे. "

मास्तर वर्गांत गेले. लहान लहान मुलें नीट बसलीं होतीं सगळीं. सर्वांनीं पुस्तकें उघडलीं. वह्या काढल्या. तारखा घातल्या आणि मास्तर काय शिकवितात याकडे सर्वांचें लक्ष लागलें.

मास्तरांनीं कविता शिकविण्यास घेतली. बालकवींची कविता ती. ' श्रावण मास ! '

वरतीं बघतां इंद्रधनूचा गोफ दुहेरी विणलासे
मंगल तोरण काय बांधलें, नभोमंडपीं कुणी भासे ॥
झालासा सूर्यास्त वाटतो सांज अहाहा ! तों उघडे
तरुशिखरावर, उंच घरांवर पिवळें पिवळें ऊन पडे ॥

अगदीं शांतपणें मास्तरांनीं ही कविता वाचली. मुलांना वाचायला सांगितली.

" कोण वाचतो गड्या ? "

सगळ्यांचे हात वर उठले. पण इतक्यांना एकदम कसें विचारणार ? एकालाच विचारणें शक्य होतें. पुढें मास्तरांनीं प्रश्न विचारला,

" देवाचं धनुष्य कुणीं पाहिलं ? "

" आम्हीं " सगळीं मुलें.

" तें कुठें असतं ? "

" आकाशांत " सगळीं मुलें.

" आतां मी ज्याला प्रश्न विचारीन तोच फक्त उत्तर देईल हं. आपल्याला पाऊस कोण देतो ? "

" देव " अनंतानें उत्तर दिलें.

" कुठून देतो ? "

" ढगांतून. "

" ढग कसे असतात ? "

ज्या ज्या मुलाकडे मास्तरांनीं बोट दाखविलें त्या त्या मुलानें मोठ्या ऐटींत आजुबाजूला गौरवानें पाहात चटचट प्रश्नांचीं उत्तरें दिलीं. दर वेळेला वर्गांतील सगळे हात उठत आणि खालीं जात.

एका वेळीं एकच मुलगा उभा राही. बाकीचे निराश !

पुढची कविता मास्तर वाचूं लागले. एक मुलगा धीटपणें उठला. म्हणतो, " सर, आतां मला प्रश्न विचारा. " मास्तरांनीं तें कबूल केलें. प्रश्न विचारला गेला.

पण मास्तरांची सगळी शिस्त गुंडाळून ठेवून दुसऱ्याच मुलानें उत्तर दिलें ! तिसऱ्या प्रश्नाच्या वेळीं देखील असेंच झालें.

आणि चौथ्या प्रश्नाअगोदर झाडून साऱ्यांचें लक्ष उजवीकडील तिसऱ्या बाकावर लागलें. आपल्या जागेवरून सगळीं मुलें तिकडे पाहूं लागलीं. मास्तरांनाहि क्षणभर कांहीं सुचेना.

विनायक ओक्साबोक्शीं रडत होता. त्याचे सावळे गाल आसवांनीं भिजून गेले होते. त्यांतच पुन्हा मास्तरांनीं त्याच्या पाठीवरून हात फिरवून त्याला रडण्याचें कारण विचारण्यांत चूक केलेली ! अशानें कोठें मुलें रडायचीं थांबतात ? विनायक अधिकच हुंदके देऊं लागला. रडत रडतच त्यानें मास्तरांना कारण सांगितलें. " सर, तुम्हीं मला कालपासून एकहि प्रश्न विचारला नाहीं. मीं कालहि हात वर केला होता. आज देखील प्रत्येक वेळेला तुम्हीं दुसऱ्यांनाच विचारलेत. तुम्ही माझ्यावर रागावलांत ? मी मठ्ठ आहें असं तुम्हांला वाटतं. " आणि बाकीचीं वाक्यें हुंदक्यांनीं पुरीं केलीं गेलीं !

ते सगळे हुंदके थोपवून धरणें मास्तरांच्या शक्तीबाहेरचें होतें. विनायकाच्या जणूं हृदयाला जखम झाली होती व सगळा जीवनरस डोळ्यांवाटे बाहेर ठिबकत होता. काय करावें हें मास्तरांना कळेना. त्यांना वाईट वाटलें.

पण त्याच वेळीं त्यांना असा भास झाला, कीं कोणीतरी आपल्या

पाठीवरून मायेनें हात फिरवून आपला शीण घालवीत आहे! विनायकाचे ते कढत अश्रु, त्यांच्या सरीवर सरी! चौदाचौकड्यांचें राज्य देऊन सुद्धा एखाद्या राजाला हीं आसवें मिळालीं नसतीं. कुबेराची सारी संपत्ति ओवाळूनहि कुबेराला निराश व्हावें लागलें असतें. हें खारें पाणी दुधाच्या समुद्रांतून निघालें होतें. ज्यांच्या दैवीं तें लाभणें लिहिलेलें असतें त्याला जगांतील कोणतीहि आपदा सहनीय वाटते.

हेंच अमृत हा माणूस रोज रोज पितो आणि म्हणूनच याच्या डोळ्यांवर जगण्याची धुंदी सदा सर्वदा असते. असल्या बेहोष माणसाला पाहूनच कदाचित् कोलरिज़्नें रेखाटलें असेल तें चित्र—

Beware! Beware!!
His flashing eyes, his floating hair!
Weave a circle round him thrice,
And close your eyes with holy dread,
For he, on honeydew hath fed
And drunk the milk of Paradise.

वर्धा
१९.१०.४०
सकाळीं ९ वाजतां

## ।१३। गं गा दे खी ल आ ट ली ?

अरुण आपल्या खोलींत उदासपणें बसला होता. वेळ करकरीत तिसांजी. अंधेरी वातावरण सर्वत्र पसरलेलें. बाहेरच्या कोलाहलाचा आंत उपसर्ग नाहीं.

असें वातावरण माणसाला उदास बनवितें. आपण बाह्य जगांत आहोंत ही जाणीव अरुणला होती; पण त्याची कल्पनासृष्टि पूर्व-स्मृतीचे पडदे त्याच्या डोळ्यांसमोर आणून सोडीत होती. त्याचे विचार चालू होते. मागचे प्रसंग – सुखाचे, दुःखाचे, उद्वेगाचे – झरझर त्याच्यापुढें येऊन जात होते. विचारांच्या प्राबल्यानें तो दूरवर वाहात गेला होता जणूं ! म्हणूनच कीं तो काय एकदम दचकला आणि भानावर येऊन दिवा लावावयास टेबलावर गेला.

परत पलंगावर येऊन टेबलाकडे पाहात असतांना त्याची दृष्टि दिव्याच्या प्रकाशांत असलेल्या सुंदर चौकटींत बसलेल्या एका फोटोकडे गेली. तो सारखा त्या चित्राकडे पाहूं लागला. ओठ जरी हालत नव्हते तरी त्याचें मन बोलत होतें, 'ही आपली बहीण, हिलाच बहीण मानायचं का ? आपली खरी बहीण कुठें असेल ? आपल्याला बहीण तरी असेल का ? नसे ना ! ह्या बहिणीनें तरी आपल्याला काय कमी केलं ?'

त्याला त्याची ताई सर्वत्र दिसूं लागली. मागच्या गोष्टी त्या. ताई बसली असतां हा जाऊन तिच्या मांडीवर डोकें ठेवून पडायचा. दोघांनीं एकमेकांकडे पाहिलें म्हणजे हसायचें !

कित्येक प्रसंग त्याला आठवत होते. प्रेमाचे, वात्सल्याचे ! त्यानें आठ दिवसांपूर्वीं आलेलें ताईचें पत्र काढलें. ज्या पत्रांत अरुणनें आपले सर्व मनःस्ताप व्यक्त केले होते त्याचें उत्तर म्हणून ताईचें तें पत्र होतें. तो पत्र वाचूं लागला,

" अरुण, तूं आपल्या मनाला उगीच गोष्टी लावून घेत आहेस. झालं काय तुला ? तुझ्यासारख्या मुलानें असं करावं का ? म्हणे माझ्या जन्माची हकिगत माझ्याजवळून कां लपवून ठेवलीस ! असं विचारतात का कुणी वेड्यासारखं ?

" पण तुला कुठून कां होईना जी हकिगत कळली ती पूर्ण कळती तर बरं. मी तुला पत्रांत काय लिहूं ? इथें तुला एवढंच सांगतें, कीं मी तुझी बहीण नव्हे, माई तुझी आई नव्हे नि अप्पा तुझे वडील नव्हत. त्यांनीं तुला कोणत्याच प्रकारें उणं पडूं दिलं नाहीं हें तूं लिहिलंस तें अगदीं खरं आहे. तूं लहानपणापासून आमच्या घरीं आहेस पण तुला परकं वाटलं नाहीं यांत काय तें समज !

" पण तुला माहिती कळली कुठून ? बाबांची तर सक्त ताकीद होती, कीं तुझ्या लग्नापर्यंत कुणालाच कांहीं कळूं नये म्हणून ! वाईट वाटून घ्यायचं नाहीं बरं का ! आपल्या अभ्यासाव्यतिरिक्त इतर गोष्टी मनांत आणूं नकोस. तुझ्या मनाला स्वस्थता नाहीं असं तूं लिहितोस, पण तसं करून कसं चालेल ? तूं एक दोन दिवसांची सुटी काढून माझ्याकडे ये किंवा माईकडे जा. माझ्याकडे आलास

तर मला करमेल नि सर्व खुलासा नीटपणें करतां येईल. यायचं विसरूं नकोस बरं का ! आणि येतांना इकडच्या पत्त्यावर पत्र घालून ये."

अरुणनें पत्र दोनदा वाचलें. 'समजा, मी आतां ताईकडे गेलों तर ती कशा दृष्टीनें माझ्याकडे पाहील ? मी कसा वागेन ?' त्याला नीटशी कल्पना येईना.

तो डाव्या कुशीवर वळला. त्याला रडायला येत होतें. कांहीं अस्फुट वाक्यें तो पुटपुटत होता. उशीखालून डावा हात घालून त्यानें आपली डायरी काढली. चालू महिन्याचीं पानें तो चाळूं लागला. त्याला वाटेल त्या पानावर तो थांबे. थोडें वाचल्यासारखें करून दुसऱ्या पानावर जाई.

**ता. ३ जुलै**—"सौ. राधाकाकूंनीं सांगितलेल्या हकिगतींत कांहीं सत्यांश असेल का ? मला दिवसभर मांडीवर घेऊन माझं कौतुक करणारे अप्पा माझे वडील नव्हत. स्वतःच्या तोंडांतील विडा चावून रंगल्यावर माझ्या तोंडांत भरणारी माई माझी आई नव्हे नि उठल्या-सुटल्या 'अरुण, अरुण,' करणारी ताई...! ती देखील माझी बहीण नव्हे !"

इतकेंच वाचून त्यानें पानें पलटविलीं.

**ता. ७ जुलै**—"आज माईकडून पत्र आलं. मला पत्र पाठवितां यावं म्हणून मुद्दाम मीं तिला लिहिणं शिकवलं. सुशिक्षित नवऱ्याची अशिक्षित बायको. पण किती उदार अंतःकरणाची आहे !

"माझी आई, माझे अप्पा, माझी ताई ! काय संबंध त्यांचा माझा ? हीं माणसं किती चांगलीं ? जगांत सर्वत्र अशींच माणसं आहेत का ?"

**ता. १२ जुलै**—" आज ताईचं उत्तर आलं. जाऊं का तिच्या गांवाला ? माझी आई कुठें आहे हें सांगेल का ती मला ? आई कशी होती माझी ? अजून आहे का ? कुठें असेल ? मी तिला एकटाच होतों कीं आणखी बहीण भाऊ होते मला ? किंवा मी एकटा असूनहि तिला भारी झालों होतों ? मला घेऊन मिरवायची तिला लाज वाटली असेल का ? माझ्या रूपानें तिचं पाप तिच्या कडेवर बसून चारचौघांत मिरविणार होतं का ?

" असं जर असेल तर आहे ही परिस्थिति काय वाईट आहे ? माझ्या माईनें माझ्यासाठीं काय केलं नाहीं ? मला पक्की आठवते माझी इंग्रजी दुसऱ्या वर्गांतील सवय. खिशांतल्या निळ्या पेन्सिलीनं पांढऱ्या भिंतीवर इंग्रजी नांवं लिहायची मला फार आवड. मी भराभर लिहून काढीं. पण त्याबद्दल, ' अरुण, शहाण्या मुलांनीं असं करूं नये ' इतकेंच ती म्हणत आली होती आणि अनेक वेळां तिनें भिंती पुसून काढल्या होत्या. पण तेच शेजारीं राहाणारे दत्तोपंत. त्यांच्या चिंतूनें धोब्याला दिलेल्या कपड्यांची यादी भिंतीवर लिहून ठेवल्याबद्दल त्यांनीं त्याला फाड्फाड् मारलें व भिंत वाईट केली म्हणून त्याच्याकडून स्वच्छ करवून घेतली. माझे वडील कसे असतील ? अप्पांसारखे कीं दत्तोपंतांसारखे ? "

छातीवर पडलेलें मघाचें ताईचें पत्र वाऱ्यानें उडवून नेलें होतें तें त्यानें वर उचललें व पुन्हा डायरीचें पान उलटून तो वाचूं लागला.

" ह्या जीवांना माझ्यामुळें किती त्रास झाला असेल ? मी त्यांच्याजवळ नानाप्रकारचे हट्ट घेतले असतील. माझ्या आईला मी भारी होतों नि यांनीं मात्र माझं फुलासारखं पालन केलं.

" या सुटींत मी आजारी होतों. ताप म्हणजे काय साधा उन्हाचा. पण ' अग, आई ग ' म्हणून मीं कपाळावर हात ठेवतांच, तिघांची काय दशा झाली ! अप्पा एवढे पुरुषासारखे पुरुष पण चटकन् धोतराचा सोगा त्यांनीं डोळ्यांना लावला.

" हीं माणसं माझ्याकरतां रडतात, मी यांच्याकरतां रडतों पण आमच्याकडे पाहून हसणारेहि आहेत हें मला किती उशीरा कळलं. "

**ता. १९ जुलै**—" आईबापांचा पत्ता नसलेला पोर ! दुसऱ्याच्या घरीं वाढलेला पोरगा मी ! अरुण माझं नांव !

" उद्यां ही गोष्ट जगजाहीर झाली म्हणजे लोक माझ्याकडे आतांच्या दृष्टीनें पाहातील का ? मला बेजबाबदारपणें टाकून जाणारी माझी आई आज हसत असेल कीं रडत असेल ? मेली असेल ? पतिव्रता असेल, कीं...? पण कितीहि झालें तरी ती माझी आई !

" मी चौकशी करूं का ? वरून नीट दिसणाऱ्या या दलदलींत पाऊल घालूं का ? यांत फसणार तर नाहीं मी ? माझ्या पायाला कांटे तर बोचणार नाहींत ?

" असं झालं तरी काय हरकत आहे ? माझ्या आईचा शोध लागला म्हणजे झालं ! ती कशीहि असो. मला पाहून तिचे हात पुढें होतील. डोळे भरून येतील. मला जवळ घेऊन ती ईश्वराला म्हणेल, ' देवा, माझ्या राजाला सुखी ठेव. '

कल्पनेचे मनोरे बांधण्यांत तो चूर झाला. कितीहि भराऱ्या मारायच्या झाल्या तरी पक्षी समोर दिसलेल्या झाडावर अखेर बसतोच. त्याचें लक्ष डायरीकडे गेलें. परवां लिहिलेला मजकूर तो वाचूं लागला—

" ठरलं ताईकडे जायचं ! तिला सर्व हकिगत विचारायची ! माझी आई शोधून काढायची ! ती कुठें का असेना, तिला शोधून काढणं हें माझं – तिच्या मुलाचं – काम ! कल्पान्तापर्यंत जरी काल लागला तरी हरकत नाहीं. प्रत्यक्ष काळाच्या दाढेंतून मी तिला ओढून काढीन. मला मरण आलं तरी आईचाच ध्यास घेऊन मरेन. "

" अरुण ! अहो नाना ! दार उघडा, मी बाळू आलों आहें. "

दारावर थाप पडली व हे शब्द त्याला ऐकूं आले. अश्रूंनीं उशी भिजून गेली असतांना अशा स्थितींत बाळूला आंत घेऊन त्याच्याशीं बोलण्याची अरुणची अगदींच इच्छा नव्हती. उसासा आवरून त्यानें उत्तर दिलें, " बाळू, तुला काय सांगायचंय् तें तिथूनच सांग ना रे ! "

" हें पाहा ! " बाळू बोलूं लागला, " उद्यां आमच्या बेबीचा वाढदिवस आहे. आईनें तुम्हांला जेवायला सांगितलं आहे. बरं का ?..."

उत्तराची वाट न पाहातां बाळू निघून गेला. अरुणची स्थिति केविलवाणी झाली. ' वाढदिवस ! माझा वाढदिवस कसा झाला असेल ? माईनें कितीहि चांगलं वागवलं असलं तरी आईनें जें केलं असतं तें माई कशी करणार ? शिवाय माईला माझा नक्की जन्मदिवस तरी माहीत असेल का ? उद्यां अरुण बाळूकडे जेवायला जाणार वाढदिवसानिमित्त ! '

हा विचार अरुणला असह्य झाला होता. मनाला विचारलेल्या हजार प्रश्नांपैकीं एकाहि प्रश्नाचें उत्तर देण्याचें त्याच्या मनानें नाकारलें

होतें. माई, ताई, अप्पा, तिघेंहि त्याच्या मनःश्चक्षूंसमोर दिसूं शकत पण...त्याची आई !

ताईनें पाठविलेलें पत्र त्याच्या छातीवर मोकळें पडलें होतें. त्यावरच त्याची काळ्या कव्हराची डायरी उताणी पडली होती व अत्यंत अनुकंपनीय स्थितींत त्याचें निःस्तब्ध अश्रुमोचन चाललें होतें.

दहा मिनिटें, पंधरा मिनिटें, अर्धा तास ! तो रडणार तरी किती ? डोळ्यांतून गालांवर ओघळणारे थेंब तेथेंच थांबले. तो छताकडे दृष्टि लावून स्वस्थ पडून राहिला. त्याच्या लक्षांत आलें, ' आपण ताईकडे गेलों होतों. तिथें त्या वेळीं राहातांना आपल्याला कसं वाटलं ? ताईनें सांगितलेली आपली कर्मकथा ! '

त्यानें आणखी एक वही हातीं घेतली ! ती त्याची दुसरी रोजनिशी होती. नव्या जीवनाचा वृतान्त त्यानें नव्या डायरींत लिहून ठेवला होता. कर्मकथेनें त्याला जणूं नवीन दिशा दाखविली होती.

**ता. २२ जुलै**—" यापुढचीं पानं लिहितां येतील किंवा नाहीं याची मला शंका वाटत आहे. मनाची तयारी आहे पण हात थरथरतात.

" ताईला माझ्या इथें येण्यानें किती पण आनंद झाला ! तथापि माझं वागणं तिला विचित्र वाटलं नसेल ना ?

" कसंहि असलं तरी माझी ताई ती ! झटपट सर्व विसरून जाईल !

" कालचीच गोष्ट ! तिचे अनंतराव नाटकाला गेले होते. मला जायचं नव्हतं नि माझ्याकरतां ताई पण गेली नव्हती. ती वेळ अगदीं योग्य होती. मीं ताईला एकदम प्रश्न केला.

" बिचारी ताई ! सांगतां सांगतां प्रत्येकदा ' वाईट वाटून घेऊं नकोस ' म्हणून म्हणत माझ्याकडे कशी दीनवाणी पाहात होती !

" गालावर जखमेची उभी खूण ! गोरापान वर्ण ! नाकाचा शेंडा खालीं झुकलेला. हिरवं लुगडं फार करून नेसणारी आणि कपाळाच्या आंठ्या मिनिटामिनिटानें बदलविणारी ! ती माझी आई ! हल्लीं नांव सरस्वती बर्वे·

" आज पांच वर्षांपासून माझी आई इथें आहे ताईच्या गांवाला. ताईनें तिला आपली ओळख देखील दिली नाहीं. तिच्याशीं कोणत्याच प्रकारचा संबंध न ठेवण्यांत ताईचा कांहीं उद्देश असेल का ? माझ्या कानीं पण ह्या गोष्टी तिनें घातल्या नाहींत !

" उद्यां मी जाऊन भेटतोंच आईला ! ताई यायला तयार नाहीं. नसूं दे. माझ्या आईला भेटायला इतर कशाला हवेत ?

" आई ओळखील मला ? ज्या परिस्थितींत तिनें मला टाकून दिलं त्यावरून वाटतं, कीं देवा...

" पण देव काय करणार ! त्याच्या मनांत असतं तर ह्या गोष्टी होऊं दिल्या नसत्या त्यानें ! माझी आई जेव्हां मला त्या मिशनऱ्याच्या हातांत द्यायला लागली नि अप्पांनीं जेव्हां भांडण सुरू करून मला आपल्या ताब्यांत घ्यायचा प्रयत्न केला, तेव्हां देव जर खरा असता तर त्यानें तिच्या मनांत सद्बुद्धि दिली असती.

" पण ती तर मिनिटभर देखील उभी राहिली नाहीं म्हणे तिथें ! आई म्हणजे वात्सल्याची गंगा ना ? ही गंगाहि आटते का ?

" प्रेम ! आई बाप, बहीण भाऊ, आईचें आपल्या मुलावर प्रेम ! या शब्दांबद्दल मला आतां शंका यायला लागली आहे. पूर्वींच्या कल्पना नि आतांचा अनुभव ! आई म्हणे मुलाकरतां आपला प्राण देते. छे ! या कविकल्पना आहेत. हीं कल्पनेच्या भरारीवर रंगवलेलीं

चित्रं आहेत.

"तरी पण हें सर्व आतांच मी कसं म्हणूं ? अजून माझ्या आईची भेट झाली नाहीं. कदाचित् माझी आई मला ओळखेल. माझ्याकरतां ती रडेल देखील. तिचा एक जरी अश्रु माझ्या डोळ्यांनीं दिसला तरी मी समजेन, देव आहे ! आई मुलांकरतां रडते ! कवि सत्यसृष्टीचे दिग्दर्शक आहेत. उन्हाळा असला तरी गंगा आटत नाहीं उलट तिला पूर येतो ! उद्यां जातोंच मी तिकडे..."

**ता. २६ जुलै**—" आज चार दिवस झाले. एक ओळ लिहिली नाहीं. लिहायची तरी कां ? जी गोष्ट उभ्या जन्मांत कधीं विसरणार नाहीं ती लिहून ठेवायची तरी कशाला ?

" केवढ्या आशेनें मी आईकडे गेलों. ताईचं ऐकलं नाहीं. स्वतःचाच हट्ट सर्वे घेऊन निघालों.

"दीड फर्लांगावर बंगला असतांना जिच्याकडे ताईनें एकदाहि फेरी केली नाहीं, तिच्याकडे जातांना मला थोडा विचार करावयास हवा होता, पण आतां काय...

"ताईनें सांगितलेल्या सर्व खुणा पटल्या. तिनें त्या सांगितल्या नसत्या तरी मीं माझ्या आईला ओळखलं असतं. माझेहि डोळे घारे आहेत. नाक अगदीं तसंच आहे.

"किती आनंदांत गप्पा मारीत होती ती. चहाचा कप तिनें 'त्यांच्या' हातीं दिला नि एका खुर्चीवर ती बसणार इतक्यांत मी तिथें पोचलों.

" तिनें मला ओळखलं का ? तिच्या कपाळावर आठ्या पडल्या. ती मला घेऊन बाहेरच्या आंगणांत आली.

"आईनें मला एकान्तीं बोलावलं तेव्हां वाटलं, ही आतां मला मोठ्या आनंदानें भेटणार...

"जगांत पूर्वी अशा गोष्टी कधीं घडल्या आहेत, कीं माझ्यावरचा हा पहिलाच प्रसंग ? मी हात समोर केला पण...

"एकदम मला माझे हात मागें घ्यावे लागले. माझी सर्व हकिगत ऐकून घेतांना तिनें माझ्याकडे पाहिलं देखील नाहीं. सरळ मोगऱ्याच्या झाडाकडे ती पाहात होती. आंगणांतील बगीच्यामधील छोट्या दगडावर तिनें उजवा पाय ठेवला होता. जवळच्या फांदीचीं पानं ती खुडत होती. वाऱ्यानें वारंवार उडणारे केस सावरण्याकरितां दुसरा हात डोक्यावर जात होता. मी समोरच बाजूला उभा होतों. आशाळभूतपणें, अगदीं आपलेपणाच्या स्निग्ध दृष्टीनें मी तिच्याकडे पाहात होतों.

"तो प्रसंग जन्मभर विसरायचा नाहीं कधीं मी ! माझी हकिगत सांगून झाल्यावर मला वाटलं, ती मला उत्तर देईल. नंतर मी तिला प्रेमभरें हाक मारीन, 'आई'...

"ह्यापुढील मजकुरासाठींच मी तीन दिवसांपासून डायरीला हात लावला नाहीं.

"तिनें माझ्याकडे पाहिलं, पण क्षणभरच ! भुवई वर आकुंचित करून, कपाळावर आठ्या पाडून, निमुळतं तोंड करून त्रासिक आवाजानें ती म्हणाली,

"हें पाहा, तुमचा किनई गैरसमज झाला आहे कांहीं तरी ! तुम्ही दुसऱ्याच कुणाला तरी उद्देशून हें बोलतां आहांत. माझा त्यांत काय संबंध ? बरं, जा तुम्ही आतां. झाली गोष्ट वाईट झाली. मला नाहीं

वाटत इतक्या दिवसांनीं तुमच्या आईचा शोध लागेल म्हणून ! बरं, आतां मला वेळ नाहीं. तुम्ही जा. अशा गोष्टी इथें करूं नका. तिकडून ऐकायच्या झाल्या तर उगीच...'

" ती थांबली देखील नाहीं. मी दिङ्मूढ झालों होतों. तरी मला तिथून परतणं भाग होतं. कंपौंडाच्या बाहेर येतांना मीं पुन्हा एकदा तिच्याकडे पाहिलें. ती गंभीरपणें ' त्यांच्याशीं ' कायसें बोलत होती.

" घरीं आलों. माझी ताई रुमाल विणीत बसली होती. मीं तिच्याकडे पाहिलं नि तिनें कांहीं विचारावयाच्या आधींच मला लहान मुलासारखं रडायला आलं.

" माझ्या आशेच्या फुलांवर माझ्या आईनें आपल्या उत्तरानें आग ओतून दिली होती.

" राहूं द्या आतां हें सर्व ! ' तिकडे ' ऐकूं जाईल म्हणून आई उभी देखील राहिली नाहीं. माझ्याकरतां – तिच्या पोटच्या पोराकरतां – तिला दहा मिनिटं खर्च करतां आलीं नाहींत नि ' तिकडे ' ऐकूं जाईल म्हणून तिनें माझ्याशीं बोलणं बंद केलं.

" ' तिकडे ' 'ते' ' त्यांना ' ! समजा आज ' तिकडची ' भीति माझ्या आईला नसती, ' तिकडच्या ' मनांत कांहीं संशय येण्यासारखा नसता तर ? माझी आई माझ्याशीं बोलली असती ? मला तिनें जवळ केलं असतं ?

" याचं उत्तर शोधायचं कुठें ? मातेचं अपत्यावरील सहजवात्सल्य गेलं कुठें ? "

नागपूर
१८.७.३३
रात्रीं ८ वाजतां

## ।१४। ते दिवस

पुष्कळ लोक एक दुःखोद्गार काढतात आणि म्हणतात, " काय ते विद्यार्थीदशेंतील दिवस! खरंच बुवा किती लवकर गेले! काय मौज! अजून त्यांचं स्मरण झालं म्हणजे वाटतं, कीं त्याच दशेंत परमेश्वरानें आपणांस ठेवावं. "

तथापि मी असं कधींच म्हणणार नाहीं!

यावरून असा मात्र कुणीं कयास बांधूं नये, कीं आज मी त्यापेक्षां जास्त सुखांत आहें. मला भरभक्कम पगार सुद्धा नाहीं. मी एक साधा मिलमधील कारकून आहें. सकाळीं आठ वाजल्यापासून सारखं रखडत राहून देखील " ते दिवस मजेचे होते " असं माझ्यानें म्हणवत नाहीं.

मी असेन बारा वर्षांचा. तेव्हां मीं इंग्रजी पहिलींत प्रवेश केला. सुरुवातीला एकदम तो इंग्रजी कारखाना पाहून मला बुजल्यासारखं झालं नि मी इंग्रजी भाषेला जरा वचकूनच वागूं लागलों. त्यामुळें माझा अभ्यास चांगला राहून मास्तर माझ्यावर नेहमीं खूष असत. पुढें पुढें अभ्यासाचं मला फारसं भय वाटेनासं झालं.

तसा मी मराठी शाळेंत देखील हुशार होतों. पण मला वाटे, इंग्रजी शाळेंत शिकणं म्हणजे नुसतं हुशार म्हणून गाजणं नव्हे.

दुसरें,—दुसरेंच कांहीं तरी! अशी भावना होण्याला काय कारणें झालीं असतील हें मला स्पष्ट सांगतां येत नाहीं.

कांहीं तरी नवीन! नावीन्य मी पाहात होतों आणि जसजसा एकेक वर्ग मी वर चढूं लागलों तसतसा हा शोध जास्त कसोशीनें होऊं लागला. त्या वेळीं आमच्या शाळेंत 'शान' बरीच बोकाळली होती. म्हणजे शान हा आजकालचा शब्द नव्हे हें यावरून सहज दिसून येण्यासारखें आहे. शानचें व्यापकत्व किती आहे हें मला सांगतां येत नाहीं. अर्थ मात्र कळतो आणि माझी खात्री आहे, कीं तो वाचकांना – निदान विद्यार्थीवाचकांना तरी – चांगलाच कळतो. मी 'शान' च्या सदरांत खालील गोष्टींचा समावेश करीत असें—

१. मी सुंदर आहें अशी फाजील भावना होऊं लागणें!

२. अशी एकदा भावना झाली, कीं सौंदर्यवर्धनाची लालसा वाटून त्यासाठीं कृत्रिम उपायांची आवश्यकता भासणें.

३. आणि या सौंदर्यवर्धनास देशी उपाय म्हणून चालणें, बोलणें, हसणें, रागावणें, रडणें व लाडणें वगैरेची तऱ्हा बदलविणें!

ह्या गोष्टी मला माझ्या व्यवसायबंधूंकडून सहजासहजीं कळत होत्या. माझी देखील हौस मीं वाढविली. मला घरची परिस्थिति अनुकूल होती. आई लहानपणींच वारल्यामुळें आईविना पोर म्हणून बाबांनीं मला कधींच कमी पडूं दिलें नाहीं आणि अगदीं गरिबींत देखील त्यांनीं दोनशें रुपये मागें टाकले होते.

वाढता व्याप म्हणून बाबांजवळ मीं ३ रु. महिना 'जादा' मागितला. त्यांनींहि तो देण्याचें कबूल केलें, कारण परीक्षेंत माझा

निकाल चांगला लागला होता आणि परीक्षेच्या मार्कांशिवाय माझ्याकडे विशेष लक्ष देण्याची बाबांना आवश्यकता वाटत नव्हती.

ती खटावमकनजीची ४॥ रु. किंमतीची धोतरजोडी ! जरा अघळ पघळ नेसून आणि पंखे काढून चाललें म्हणजे बरें वाटे.

ते लांब केस ! जरा साबू वगैरे लावल्यामुळें जमून बसत. टोपीचा खर्च साबूकडे आणि तेलाकडे.

मी शान करूं लागलों !

मला वाटे मी खूप सुंदर आहें ! आतां मी इंग्रजी सहावींत होतों.

माझे सहाध्यायी माझ्या भोवतीं जमूं लागले. बिचाऱ्यांकरितां चार दोन पैसे खर्च करणें मला माझें कर्तव्य वाटे. मी थोडा थोडा खर्च करूं लागलों होतों. थोड्याच दिवसांत आम्ही एक क्लब स्थापन केला. क्लबाचें ऑफिस माझ्याच खोलीवर असल्यामुळें अभ्यास थोडा मागें पडे पण मागील ' इम्प्रेशन ' नें तें सर्व निभून जाई.

असा क्लब वगैरे स्थापन झाला म्हणजे चळवळीस सुरुवात होते व मग प्रकरण भलतेंच लांबतें !

बिचारे शिक्षक ! त्यांना वाटे आम्ही खूप चांगले निघून राष्ट्राचे आधारस्तंभ व्हावें. पण येथें एक गोष्ट सांगून ठेवतों, आमच्या सर्व मास्तरांच्या जन्मतारखा विसाव्या शतकांतील नव्हत्या. त्यांना काय कल्पना बदलत्या काळाची ? त्यांनीं आगरकर, चिपळूणकरांची पिढी पाहिली होती. शिक्षकांना वाटे ते योग्य करतात. आम्हांला वाटे आम्ही चांगलें करतों !

तें आमच्या शाळेचें स्नेहसंमेलन! फारच धडाक्यांत झालें. आमच्या क्लबांतला देशपांडे हा जनरल सेक्रेटरी होता. मग काय?

पासिंग शो! कांहीं वेगळीच लज्जत असते बुवा!

दिवसांतून तीस कप चहा! तरी देखील प्रकृति म्हणण्यासारखी बिघडत नाहीं. थोडे दिवस चैन झाली क्लबांत पैशाची! आम्हीं एक नाटकहि करून दाखविलें. सर्वांनीं तारीफ केली आमच्या नाटकाची!

गॅदरिंगनंतर तीन महिन्यांनीं!

मी नापास झालों पण इम्प्रेशनमुळें प्रमोट झालों. भाग्य माझें!

गोष्टी फार थरास गेल्या होत्या. मधल्या भानगडी सांगण्यापेक्षां पुढें जाणें बरें! वडिलांना मी पास झाल्याचें पत्र टाकलें होतें व त्यांतच सुटींत मी पंधरा दिवस उशीरा येईन म्हणून लिहिलें होतें. कारण—

मी एका नाटक कंपनींत जाण्याचा विचार करीत होतों. माझ्याबरोबर माझा एक दोस्त येणार होता. बाबांनीं जमविलेले २०० रु. मला जन्माला थोडेच पुरणार होते? कांहीं तरी करणें अवश्य! मग आतांपासून मार्गास लागणें बरें! दोनशें रुपयांत कॉलेजचें पहिलें वर्ष देखील मोठ्या मुष्किलींत जायचें. मग भलतीच महत्त्वाकांक्षा कां? बाबांना न विचारतां मीं जाण्याचें ठरविलें. जम बसलाच तर परत यावयास नाक पाहिजे होतें ना? मी निघालों. बाबांना नंतर सविस्तर पत्र पाठविण्याचें ठरविलें होतें.

वरील हकिगतीनंतर सहा महिन्यांची गोष्ट! मी वर्धेच्या गाडींत बसून परत येत होतों. वर्धेला असतांनाच आमची कंपनी बुडाली होती. मला तिनें कांहीं दिवस 'ट्रायल' वर तीस रुपये दरमहा

देण्याचें ठरविलें होतें. माझ्या ट्रायलचा शेवटचा दिवस येण्यापूर्वींच ती बुडाली.

आमच्या महत्त्वाकांक्षा पार बुडाल्या. दुसरी कंपनी काढण्याच्या विचारांत मॅनेजरसाहेब गुंतले होते. इतक्यांत बाबा फार आजारी असल्याची तार मला आली. मी परत फिरलों. मला नीटपणें डोळे उघडून व डोकें स्थिर ठेवून विचार करावयास वेळ मिळाला. अशी कांहीं परिस्थिति आंगावर आली म्हणजे मनुष्य शहाणा होत असतो. कारण त्या वेळीं त्याला विचार करावा लागतो.

हल्लीं ! मी हा असा आहें !

माझे बाबा ! माझ्यासाठीं मरमर करून अखेर एक दिवस खरोखरीच मरण पावले !

मी ! रोज सकाळीं आठ वाजतां कांहीं न खातां पोळ्यांचा डबा घेऊन मिलमध्यें जात असतों. विद्यार्थीदशेंत म्हणजे मागच्या वर्षीं घेतलेल्या खटावमकनजीच्या धोतरजोड्या अजून मला पुरून उरतात. माझ्या आजच्या सृष्टींत मिलचे मॅनेजरदेखील इतक्या तलम धोतरजोड्या वापरीत नाहींत ! लांबसडक केस ठेवणें मला आतां परवडत नाहीं !

माझे शिक्षक ! त्यांनीं चळवळ्यांच्या वळवळीनें फसूं नये एवढीच परमेश्वराजवळ माझी प्रार्थना आहे!

माझी शाळा ! तिच्यावरून जातांना मी रोज तिच्याकडे पाहातों. ती आहे तशीच आहे. तिच्यांतून भावी नागरिक तयार होत असतात.

माझे मित्र ! त्यांनीं माझ्याजवळून बरेंच लाटलें होतें. भेटतात कधीं कधीं सायकलवर ऐटीनें जातांना ! त्यांनी केला तर मी देखील

त्यांना नमस्कार करतों. नाहींतर मी आपला इकडे तिकडे पाहून जसें कांहीं आपलें लक्षच नाहीं असें दाखवून वेळ मारून नेतों.

मिलचा मॅनेजर मला रु. २५ दरमहा देतो. आज सर्व खर्च जाऊन माझ्याजवळ बरेच पैसे उतरतात. मागील महिन्यापासून मीं पुस्तकें विकत घ्यावयाचें ठरविलें आहें. साडेसात रुपयांचीं पुस्तकें मीं आतां जमविलीं आहेत. या महिन्यांत घेतलेल्या पुस्तकांना कव्हर लावतांना काल सहजपणें मला माझी विद्यार्थीदशा आठवली !

ते दिवस ! कसे होते ते दिवस ?

नागपूर

४.३.३३

रात्रीं १२ वाजतां

## ।१५। मि ठा चे थें ब ।

त्या दिवशीं मला अक्षरशः असें वाटलें, कीं मी जर वर हात केला तर तो खात्रीनें आभाळाला पुरेल.

आणि तसें तरी कां वाटूं नये? आज माझ्या हातीं २०० रुपये होते. संकटाची परंपरा कोसळली होती पण कधीं कुणाजवळ बापुडवाणा होऊन मीं याचना केली नव्हती. भुकेनें पोटांत तुटत असे पण कधीं कोणाजवळ धर्माचा तुकडा मागितला नव्हता. लक्तरें व चिंध्या आंगावर घातल्या तरी थंडीवाऱ्यांत कोणाच्या आसऱ्याला गेलों नव्हतों! संकटें कोणावर येत नाहींत? आलीं म्हणून काय रडायचें? कीं धर्माचा आसरा घेऊन भीक मागायची? ब्राह्मणजन्म आल्यामुळें दक्षिणा मागून त्या पैशाची आणि स्वतःच्या आत्म्याची विटंबना लोकांकडून कशी सहन करवते याचें मला त्या वेळीं आणि आतांहि आश्चर्य वाटत आहे! बापदादे इस्टेट कमवितात, त्या इस्टेटीचा वारसा पत्करून अप्रामाणिक संपत्ति गिळून एक प्रकारें कोळसे गिळणारांचा मला नेहमींच अचंबा वाटत आला होता! देवा, ज्या लोकांना पैशाची कदर नाहीं त्यांना देतोस कशाला पैसा असे मी वारंवार म्हणत असें. पण अशाच माणसांना देव धार्जिणा असतो.

# मि ठा चे थें ब

आजचे माझे पैसे ! कपाळाचा घाम तर्जनीनें टिपला व भिजलेल्या हातानें ते पैसे मीं घेतले होते. चोरानें, अप्रामाणिक माणसानें जर त्या पैशांना हात लावला असता तर त्याचे हात जळण्याइतकें प्रखर सत्य व तेज त्या माझ्या पैशांत होतें ! लोखंडाचें सोनें होतें किंवा नाहीं हें मला ठाऊक नाहीं. पण घामाचा पैसा झालेला मी माझ्या आयुष्यांत प्रत्यहीं पाहात आलों आहें. त्यांचा मोहक, मादक सुगंध !

तेच घामाचे पैसे घेऊन मी बाहेर पडलों. जवळच चहाचें दुकान होतें. असें वाटलें, कीं जरा जावें. पण छे ! त्या गढूळ पाण्यांत ते पैसे बुडवायचे ? विडा ? तो तरी चार दोन मिनिटांत घशाखालीं जाईल. जितके दिवस ते पैसे मिळवायला लागले तितके दिवस तरी ते पुरले पाहिजेत ना ?

त्या दिवसापर्यंत मी स्वतःला एक नुसता ' कर्मण्येवाधिकारस्ते ' म्हणून काम करणारा समजत होतों. त्याचें फळ आज मला मिळालें. माझी तरी काय एवढी अपेक्षा होती ? जास्त काम केल्यानें माणूस मरत नाहीं, उलट काम टाळल्यानेंच एक प्रकारें तो मरतो हा माझा सिद्धान्त होता एवढेंच !

घरीं आलों. बाबा ओटीवर बसले होते. दाराच्या उंबरठ्यांत अर्धी बाहेर आणि अर्धी आंत बसून आई तांदूळ निवडीत होती. माझी चंपी नांवाची कुत्री नाकावर पाय ठेवून डोळे मिटून पडली होती. बाबांच्या चेहेऱ्याकडे माझें लक्ष गेलें. रोज मी तो चेहरा पाहात असें. पण आज कां कोणास ठाऊक, मी जास्त बारकाईनें पाहूं लागलों. हजारों सुरकुत्या त्या चेहेऱ्यावर पडल्या होत्या. आम्हां तीन भावंडां-

पायीं त्यांना ज्या खस्ता खाव्या लागल्या त्यांची एकेक खूण म्हणून एकेक सुरकुती त्यांच्या चेहऱ्यावर उमटली होती. अगदीं निश्चलपणें शून्याकडे दृष्टि लावणारे त्यांचे डोळे हुबेहुब विहिरीसारखे दिसत, कीं ज्यांतून जीवनाचे रांजण भरून काढावेत ! मूर्तिमंत कष्ट, क्लेश, दया आयास, आघात यांची चालती बोलती प्रतिमा म्हणजे माझे बाबा !

मी सरळ जाऊन त्यांच्या पायांवर डोकें ठेविलें; रुपये त्यांच्या स्वाधीन केले. कां तर न कळे, त्यांनीं ते खालीं ठेवले आणि ते उगीच त्यांकडे पाहात बसले. त्यांच्या डोळ्यांत पाणी चमकलें. खारें, खारें, ऊन, ऊन पाणी त्यांच्या गालांवर ओघळूं लागलें !

आईच्या तें चटकन् लक्षांत आलें, कारण तिचीहि दशा तशीच झाली होती ! तिनें संयम केला आणि कठोर मुद्रा करून ती बाबांना म्हणते, "हें काय ? आनंद झाला म्हणून तरी तो मुलांसमोर दाखवायचा असतो का ? दुःख आजपर्यंत दिसूं दिलं नाहीं. आतां तो आनंद तरी कां असा दाखवितां ? चल रे पोरा, आंत चल..."

एखादा मोठा तेजोगोल दिसावा तसें मला झालें व मी गोंधळून गेलों. जीवनाशीं झगडण्याचें आईचें तत्त्वज्ञान म्हणजे एक अमोलिक देणगी वाटली मला ! सुख आणि दुःख हीं देखील ज्याचीं त्यानेंच अनुभवावीं, नाहीं का ?

"नाहीं ग..." बाबा म्हणाले, "मला आनंद तर झालाच पण वाईटहि वाटलं. ह्या पोरानें किती सोसलं हें माझ्या मनांत आलं नि मीं एकदम धीर सोडला. आतां काय त्याच्यापासून लपवून ठेवूं ? तो आतां खांद्याला टेकला आहे."

"मीं पुष्कळ सोसलं ?" बाबांच्या वाक्यानें कधीं वाटलें नव्हतें इतकें हायसें मला त्या वेळीं वाटलें. माझा अहंकार जागा झाला व तेथेंच उभें राहून बाबा काय बोलतात तें ऐकावें असें मला वाटलें. त्यांचें मन कमकुवत झालें होतें. त्या कमकुवत क्षणांचा आपण फायदा घेऊं नये. पण आत्मस्तुतीचा क्षण कोणीं आवरला आहे आजपर्यंत ?

बाबा जणूं आपल्याशींच बोलत होते, "तसें नव्हे, पण आठवतात त्या गोष्टी कशा विसरायच्या ? पांच दहा वर्षांपूर्वींचीच गोष्ट ! तूं त्या वेळीं आठ वर्षांचा होतास. आपल्या घरीं चिमणीपुरतेहि दाणे नव्हते नि जहर खायला देखील पैसा नव्हता. सबंध दिवसभर भूक सोसली. मी आणि ही तुझ्याकडे पाहात असूं...

" शेवटीं तूं घरभर फिरलास. फिरून दमलास. हातापायांत त्राण राह्यलं नाहीं. घोंगडी टाकून उताणा पडला होतास. तुझी नजर वर गेली. शिंक्यावर घरच्या वेलीचे दोन लाल भोपळे ठेवले होते. पोटांत कावळे तोडत होते. म्हणून तें सुचलं तुला !

" दोन दिवस आपण नुस्ते भोपळेच शिजवून खाल्ले होते. कसली चव नि कसलं काय ? पाण्याला तर आसरा केला ? कशा विसरूं ह्या गोष्टी ? कसे दिवस तुम्हीं काढले. आज तूं कसा छान दिसतोस ! किती चांगले आंगभर कपडे घातले आहेस; पण तूं दहा एक वर्षांचा होतास. आपट्यांनीं तुला घरकामाची नोकरी, अन्न नि दोन रुपये महिना दिला होता. त्यांच्या घरीं पाव्हणे येणार होते. तुझ्या आंगांतलीं लक्तरं पाहून बाईसाहेब लाजून जात. तूं घरीं येऊन आईजवळ रडलास. कारण काय ? तिचं पांढरं पातळ फाडलं व त्याचा तुला सदरा शिवला. बाजारू सदऱ्याला त्या वेळीं देखील आठ आणे पडत. असले

आठ आणे कित्येक वेळां तूं आतां खर्चून टाकतोस. त्या वेळीं पोरा, वेळेला मोल असतं. एकेक दिवस...एकेक वेळ."

त्यांना एकदम अवघडलें. त्यांनीं आवरण्याचा खूप प्रयत्न केला.

बाबा रडतात! त्यांच्या डोळ्यांतून गळणारीं तीं ऊन ऊन आसवें, तें खारें पाणी! ते मिठाचे थेंब!

समोर मूठभर पैसे पडले आहेत आणि त्यांतून बाबा गतायुष्याचीं प्रतिबिंबें पाहात आजच्या जीवनाला उजाळा आणीत आहेत!

होय उजाळाच! तें दुःखाचें रडणें नव्हतेंच! तसलें दुःख हें सुख देणारेंच असतें. त्या ऊन पाण्यानें जीवनाचे फुलबाग फुलतात. मृगाच्या पहिल्या पावसानें कदंबाचीं झाडें जशीं बहरतात तसेंच, तसेंच!

आज माझ्या श्रीखंडपुरीच्या, दुधासाखरीच्या, तूपलोण्याच्या आयुष्यांत त्या मिठाच्या थेंबांना अमोल महत्त्व नव्हतें का?

हें मीठच जीवन अवीट, स्वादिष्ट करीत असतें आणि म्हणूनच मीं सुरुवातीस म्हटलें आहे, कीं मीं जर हात वर केला असता तर खात्रीनें तो स्वर्गाला पोचला असता त्या वेळीं!

नागपूर
१०.५.३८
डागा मेमोरियल हॉस्पिटल

## । १६ । सौं द र्या चें सु ख ।

ज्या गोष्टी काळजांत अगदीं खोल रुजलेल्या असतात त्यांना पुष्कळदा निजविल्या तरी जाग्या होतात; कोणी विचारल्या नाहींत तरी सांगाव्याशा वाटतात; कोणाला नको असल्या तरी लिहाव्याशा वाटतात.

खरेंच, हें एक नवल नाहीं कां ? त्या कधीं जुन्या देखील होत नाहींत. खूपशीं वर्षें जातात निघून. आपलें मन किती किती नवनवीन गोष्टी शिकून घेतें. तें मन मोठें होतें. तरी देखील त्या गोष्टी मात्र तशाच. त्या नवीन कधींच नव्हत्या आणि म्हणून जुन्या होणें कदापि शक्य नाहीं.

नवीन म्हणजे चकचकीत, डोळे दिपविणाऱ्या !

कोणतीहि एखादी बाई आपल्या अर्भकाला कडेवर घेऊन, ‘ तो पाहा चांदोबा ’ करीत त्याची फुकट करमणूक करीत असली, कीं मला जिजाची आठवण होते.

जिजा म्हणजे मला सर्वतोपरी सांभाळणारी, आमच्या घरीं अन्नावारी काम करणारी एक दुर्दैवी स्त्री, जिनें जगाचीं पुष्कळ नाटकें पाहिलीं होतीं आणि शेवटीं माझी भूमिका पाहात पाहात तिनें डोळे मिटले होते. फार आवडला होता तिला माझा अभिनय !

ती आमच्या जातीची ना पातीची. आज तिच्या फोटोकडे पाहिलें तर केस पिकलेले, नाक लक्ष्मीबाई टिळकांसारखें, कपाळाची पाटी पांढरी फटफटीत अशी ती दिसते. त्या फोटोंतून देखील ती फक्त माझ्याचकडे पाहाते. इतरत्र कोठेंहि तिचें लक्ष नाहीं. माझ्या आयुष्यांत मीं काय काय भोगलें हे पाहाणारे साक्षीदार म्हणजे तिचे दोन डोळे !

आज भाई, चंद्री, गुलाब माझ्याशीं कितीहि वाद घालीत बसले तरी जिजा सुंदर – कमालीची सुंदर – होती हें माझें मत इतकें शिकून सवरून देखील बदललें नाहीं. मी लहानपणीं म्हणत असें तसेंच व त्या शब्दांत अजून देखील म्हणतों, "आमची जिजा खूप छान–शुंदोल आहे."

जिजा माझी नि माझी होती व म्हणून मला सुंदर वाटत होती. माणसें बुद्धीनें वाढलीं तरी भावनेनें लहानच असतात.

हें सारें मला आजच कसें आठवलें ह्याचें उत्तर सोपें आहे. सायकलच्या हँडलवर उजवा हात, डावा हात खिशांत आणि ऐटींत शीळ घालीत मी चाललों होतों. उजव्या बाजूच्या तारेवर मला नीलकंठ पक्षी दिसला. मीं त्याला नकळत नमस्कार केला व नंतर माझा मीच हसलों. तो पक्षी तेथून उडून गेला. त्याच्या आवाजानें झाल्या सर्व गोष्टी जाग्या !

आमच्या घरावरून नीलकंठ पक्षी जायला लागला, कीं जिजा मला चटकन् उचलून आंगणांत नेई आणि स्वतःबरोबर मलादेखील नमस्कार करावयास लावीत असे. त्या वेळीं तसें करण्यांत तिचा उद्देश काय होता हें मला उमजत नसे. नाहीं म्हटल्यास तिचा एक उद्गार मला पुसट पुसट अजूनहि आठवतो. एकदा तो पक्षी आमच्या

आंगणांतल्या सालईच्या झाडावर बसला होता. त्याच्याकडे तिचें लक्ष जातांच तिनें मला त्या झाडाकडे नेलें आणि त्याला तीन प्रदक्षिणा घातल्या. मीं तिला जिज्ञासेनें विचारलें, " जिजा, कशाला हें सारें ?" परंतु तिनें मला सरळ उत्तर दिलें नाहीं. माझे जोडलेले हात तिनें वेगळे केले व स्वतःच्या गळयाभोवतीं त्यांचा विळखा घालून मला जवळ घेत ती उद्गारली, " माझा सोन्या शहाणा होईल अशानें. "

मला त्यामुळें मोठासा अर्थबोध झालेला नसला तरी तिच्या त्या विलक्षण वागण्याबोलण्यानें त्या पक्ष्याबद्दलची आठवण मात्र तिच्या-इतकीच मनाला घट्ट चिकटून राहिली.

त्या पक्ष्याला राजा म्हणतात. तो उजव्या हातावरून गेला म्हणजे आपल्याला म्हणे गोड खायला मिळतें. एखादें काम करायला निघाल्यावर त्यानें दर्शन दिलें तर तें काम म्हणे खूप सफल होतें. सर्वांच्याच आयुष्यांत गोड गोड खायला देऊन त्यांचीं कामें सफल करून देणारा तो नीलकंठ भाग्याचा खरा ! कितीतरी लोक त्याला नमस्कार करून कामाला लागतात.

त्याला नमन केल्यानें माझें भाग्य उगवतें असें नव्हे. परंतु त्याला नमस्कार करण्याची प्रवृत्ति माझ्यापासून इतकी दूर गेली आहे, कीं मला ती जवळची वाटते. ज्या गोष्टी दूर जातात त्या जवळच्या वाटतात !

जिजाच्या आंगावरून दूर होण्याइतका मी मोठा झालों होतों तरी देखील त्या पांखराकडे मी खूप वेळ पाहात असें. त्याच्या आंगाचा रंग अगदीं स्निग्धश्यामल असा. पंख किंचित् जांभळे. कदाचित् खूप निळे असतील म्हणून जांभळे दिसत असतील. हाताच्या मुठींत सहज

मावेल व तोंड फक्त बाहेर राहील एवढाच त्याचा आकार. त्याची ती निळी गुबगुबीत मान. ती लांबशी बोथट चोंच. ती ओठावर दाबली, कीं कशी मौज वाटे !

आणि तो मधूनच उडून गेला म्हणजे त्याच्या पंखांच्या पोटचा गाभा कसा मखमलीसारखा दिसे. निळ्या मखमलींत शुभ्र पिसांचे पराग ब्रह्मदेवासारख्या कलावंतानें स्वतःच्या निर्मितीचा विलास म्हणून कौशल्यानें बसविले होते. त्याचा तो टँव टँव आवाज ' विचित्र बीन 'ची तार छेडल्यासारखा मधुर वाटे.

किती छान पांखरूं ! इतकी सुंदर वस्तु ! कोणाला तिचें दर्शन शुभ व हवेंसें वाटणार नाहीं ?

तें पांखरूं माझ्या हातीं लागावें अशी माझी फार दिवसांपासूनची इच्छा होती. मी लहान होतों तेव्हांपासून त्याचे ते छान छान पंख एकदा जवळून पाहावे ही आस ! तें पांखरूं मला इतकें आवडे, कीं मला अगदीं हवेंसें वाटे. नेहमीं तें माझेंच नि माझेंच असावें अशी विचित्र इच्छा होई. सुंदर वस्तूबद्दलची आसक्ति माझ्या मनांत भिनली होती आणि कित्येक दिवस प्रयत्न करूनहि तें पांखरूं माझ्या हातीं लागलें नव्हतें.

परंतु आतां मी मोठा झालों होतों. तो नीलकंठ पक्षीच काय पण आणखी कितीतरी पक्षी माझ्या हातीं लागूं शकत होते. वाटेल त्याला मी तीर मारूं शकत होतों.

आतां कोठें जाणार होता तो ? त्याला आतां हातीं घेईन. माझ्या डोळ्याला स्पर्श करतील इतक्या जवळून त्याचे पंख पाहीन, किती सुख होईल मला !

आपलेपणाचे सारे सोस निवतील आणि ती वस्तु, तो भाग्याचा राजा माझा म्हणून मला मिरवितां येईल.

आणि तो माझ्या हातीं लागला तेव्हां त्याला मोठीशी इजा झालेली नव्हती. सुपलीच्या फुलासारखें सुकुमार असलेलें त्याचें पोट वरखालीं होत होतें. मला व्याध कल्पून तो मधून मधून माझ्याकडे पाहात होता.

कोण धडपड त्याची माझ्या हातून सुटून जाण्यासाठीं! जगण्यासाठीं त्याचा प्रयत्न. आपल्या सर्वस्वाची भीति. मोंगल सम्राटांच्या जनानखान्यांत शिरतांना रजपुतांच्या रूपराण्यांनीं देखील इतका जीव तोडला नसेल. त्याच्या सौंदर्यावर, त्याच्या पंखांच्या आंतील मखमलीच्या तुकड्यांवर माझीच सत्ता असावी हा केवळ माझा हव्यास! त्याचा तडफडाट पाहून मला मनस्वी दुःख होई. मी त्याला मारणार नव्हतों. माझ्यानें होईल तेवढ्या सुखांत मीं त्याला ठेवलें असतें. त्याला हवा असता तर हिऱ्यामाणकांचा चाराहि त्याला खायला घातला असता. फार दिवसाची इच्छा पूर्ण व्हावयाची होती तो माझ्या हातीं लागण्यानें!

परंतु ती त्याची व्यर्थ धडपड. त्याचें आंग सर्रर्र...असा आवाज करीत थरथरत असे. माझ्या हाताला तसें झाल्याचा भास होतांच आणखीहि एक विचार मनांत येई. माझ्या हातून हा सुटून जाणें शक्य तरी होतें का? माझ्या अहंपणाची मला झालेली जाणीव आणि त्याच्याबद्दलच्या नितान्त आसक्तीनें मनाला होणाऱ्या वेदना. दोन्ही भावांच्या सन्निवेशानें माझें मन द्विधा झालें होतें. त्याचें सौंदर्य तो दाखवूं शकला नाहीं. मीं सौंदर्य मग कशांत पाहिलें?

पिंजऱ्याच्या दारांत त्याचें तोंड घालतांच त्यानें तें मागें वळविलें. "नाहीं, नाहीं जाणार मी." त्याच्यानें सांगवेल त्या प्रकारें आणि होईल त्या प्रयासानें त्यानें मला हें सुचविलें सुचवीत राहिला ! पण...

वाटेल त्याला तीर मारूं शकत होतों मी आतां !

त्या पिंजऱ्यांत तो डोळे लावून झिमत पडलेला असे. माझ्याकडे मित्रमंडळी आली, कीं ती त्याच्याकडे पाहात. मी त्यांना सर्व सांगें. त्याच्या सुंदर पंखाचें माझ्यानें होईल तितकें चांगलें मी वर्णन करी. रोज रोज नवीन उपमा द्यायच्या ! सुख होत होतें ना मला ?

सुख !...आणि खरेंच, माझ्या डोक्यांत हा विचार पूर्वींच यायला नको होता का ? कसें सुचलें नाहीं मला तें ? त्याचें सौंदर्य...! तो आनंदानें, हर्षानें, टँव टँव करीत उडाला असतांना त्याच्या पंखांच्या आंतल्या गाभ्याची विविधरम्य शोभा ! बाहेरून निळे, जांभळे, अगदीं साधे दिसणारे त्याचे पंख आंतून मात्र आकाशाच्या नितळ नीलिम्यांत पसरलेल्या रत्नखचित चांदण्यासारखे......

...पण ते दिसायला त्यानें या फांदीवरून त्या फांदीवर व तेथून पुन्हा एखाद्या फांदीवर स्वच्छंद भराऱ्या मारायला हव्यात सारख्या ! पण माझ्या आसक्तीनें त्याला तसें उडूं दिलें नाहीं; आणि त्या पिंजऱ्यांत ? तो धड खात नसे. पीत नसे. कधीं सादहि घातली नाहीं त्यानें आणि कधीं पंखहि पसरविले नाहींत !

आमच्या घरचीं माणसें रोज रोज त्या भाग्याच्या राजाला नमस्कार करीत. तरी देखील एकहि गोष्ट शुभ अशी घडली नाहीं त्याला आणल्यापासून ! केवळ तेवढयामुळेंच म्हणून गोड देखील खायला मिळालें नाहीं कोणाला ?

# सौं द र्या चें सु ख

ज्या वेळीं तो आपली विलोभनीय कांतिशोभा हवेंत पसरवून देत असे आणि जी पाहून माझ्या चित्तवृत्ति तल्लीन होत त्या वेळीं केवळ तो माझा नव्हता म्हणून त्याचें सौंदर्य मला उपभोगतां आलें नसेल का ?

आणि आजपर्यंत मनाशीं बाळगलेली आशा, ती सौंदर्याची खाण, तो भाग्याचा राजा आतां तर केवळ माझा नि माझा झाला होता. तरीहि मला सुख दिलें नाहीं त्यानें ! त्याचा कोंडमारा झालेला.

आज जिजा माझ्या दूर गेली तरी देखील ती तिची आठवण मला हृद्य कां वाटते ? ती मला सुंदर कां वाटते ? तिच्यापासून मला सौंदर्याचें सुख कां मिळतें ?

कीं सौंदर्याबद्दलची कल्पनाच अपुरी आहे माझी ?

मंगळवार

११.२.३६

## ।१७। मृत्यूची कृपा ।

तेल संपल्यामुळें दिव्याची वात खालीं खालीं जात होती तसतसा बाहेरचा अंधार आंत येत होता. भरलेल्या ढगांना स्पर्श करून येणाऱ्या गार वाऱ्यानें खिडकीचीं तावदानें बर्फासारखीं थंड झालीं होतीं. वरील झरोक्यांतून वाऱ्याची झुळूक आली, कीं टेबलावर पडलेल्या वर्तमानपत्राचीं पानें फडफडत. बाकी सगळें शांत होतें.

सुधाकरनें दिवा मोठा केला. पलंगावर पडलेल्या रोग्याकडे स्निग्ध आणि असहाय नजरेनें पाहिलें. मन रमेना. वाईट बरें कांहींच वाटेना. सुखदुःखाची संवेदना जणूं महिरून गेली होती. हा रोगी कुडी तशीच टाकून उडून जाणार ह्याबद्दल त्याची खात्री होती.

---

ह्या गोष्टींत ज्या कविता घेतल्या आहेत त्या वेगवेगळ्या कवींच्या आहेत. गोष्टीच्या विषयाशीं व कवींशीं कांहीं संबंध नाहीं. रसिकांनीं पूजिलेल्या अत्यंत सरस अशा त्या कविता आहेत. काव्यप्रांत मला वावडा आहे. सबब स्वतः केलेल्या रद्दी कविता वाचकांवर लादण्याऐवजीं मीं जातिवंत कवींच्या काव्याकडे धाव घेतली आहे. खालीं कवींचीं नांवें दिलीं आहेत.

कडवें १, ३, ४ विनायक. कडवें २ गडकरी.

कडवें ५, ६, बोबडे, श्री. रा. —लेखक

आशेचा अंधुक आसराहि तेल संपलेल्या दिव्याच्या ज्योतीसारखा निराशा पोटांत घेत घेत नाहींसा होत होता.

खिडकीचें दार किलकिलें करून त्यानें बाहेर नजर टाकली. अंधाऱ्या आकाशांतून चंद्राचीं निस्तेज किरणें आवारांतील तगराच्या फुलांवर पडलीं होतीं. तीं त्याला प्रेताच्या थिजलेल्या डोळ्यांसारखीं दिसलीं. तो चपापला आणि परत पलंगाजवळ आला.

जवळ येतांच त्याला एकदम घाण आली. पण त्यानें मुळींच नाक मुरडलें नाहीं. डोळ्यांची उघडझाप करीत असलेल्या पलंगावरील अस्थिपंजराकडे पाहून पुन्हा त्याला भडभडून आलें. हळूच त्याच्या केसांवरून त्यानें हात फिरविला व केविलवाण्या स्वरांत हाक मारली, " जयंत."

जयंतनें डोळे उघडले. सुधाकरच्या ओठांच्या सुकलेल्या पाकळ्या थरथरत होत्या. दोघांची दृष्टि एकमेकांत मिसळली.

" सुधा, वीणा आली का रे ? "

काय उत्तर होतें सुधाकरजवळ ह्या प्रश्नाचें ? जयंतपासून वीणा कितीतरी मैल दूर होती. सुधाकरच्या नादीं जयंत बिघडला अशी इतरांप्रमाणें तिनेंहि समजूत करून घेतली होती. आपल्या प्रेमांत बांधा आलेला कोणत्या स्त्रीनें सहन केला आहे ?

जयंतच्या प्रश्नाला सुधाकरच्या अश्रूंनीं उत्तर दिलें. अर्धस्फुट शब्दांत सुधाकर म्हणाला,

" जयंत, खरंच मीं तुला जगांतून उठवलं का ? माझ्यामुळेंच तूं जगाला पारखा झालास का ? तुला पण असंच वाटतं का ? तूं कशाला जीव लावलास माझ्यावर ? मी तर जाणून बुजून अजाण पोर..."

कुणी कांहींच बोललें नाहीं. असीम, मेसूर अशी शांतता अंतःकरण जड करीत होती. घरट्यांतून खालीं कोसळून पडलेल्या पिलानें जिव्हारीं लागलेली जखम सहन न होऊन चोंच वासावी तसें जयंतनें तोंड उघडलें. जर्जर झालेलें शरीर हलूं शकत नव्हतें. हात उचलावयाची शक्ति नव्हती. मावळत्या प्रकाशांत जयंतनें सुधाला न्याहाळलें. त्याचे ओठ हलूं लागले,

" सुधा, उगीच वाटलं मरतांना वीणा दिसावी. तुझा दोष नाहीं त्यांत. सारं तुझ्यापासूनच शिकलों. आज मला जें करतां आलं थोडंबहुत तें तुझ्यामुळेंच. वाईट एवढंच, कीं तुला सोडून जात आहें. माझी कविता..."

जीवनाचें काव्य जीवाबरोबर संपलें. रात्रीचे दोन वाजले होते. मघाशीं उघडलेल्या खिडकींतून वाऱ्याचा झोत आंत आला आणि आंतला जीवन-प्रकाश घेऊन गेला. सुधानें आपले ओठ जयंतच्या कपाळाला लावले. रोगांनीं कुजून गेलेल्या त्या मांसाला स्पर्श करतांना त्याला किळस वाटली नाहीं. जीव गुदमरला नाहीं!

पण आपण प्रेताचें चुंबन घेतों आहोंत हें त्याच्या फार उशीरा ध्यानीं आलें. ज्यांना जगांत परस्परांवांचून दुसरा आसरा नव्हता त्यांचें जीवन वेगळें झालें!

पहाटेपर्यंत तें प्रेत तसेंच राहिलें होतें. जगानें कांहींच दखल घेतली नाहीं मृत्यूची. सुधाकर एकटाच तेथें बसला होता. त्याच्या डोक्यांत थैमान माजलें होतें. अंतःकरण निराशेनें, किंकर्तव्यतेनें व्यापलें होतें.

माणूस मेल्यावरहि त्याला पैसा लागतो. कसें विलक्षण आणि विदारक

सत्य आहे हें ? प्रेताची व्यवस्था कशी करावयाची हा सुधाकरला प्रश्न पडला. घरांत कांहींच नव्हतें. जगानें संबंध तोडल्यापासून घराच्या भरंवशावर आजवर निभलें. पण काय, आज ना उद्यां भुकेनें तडफडून मरण्याचा प्रसंग यावयाचा होताच !

सुधाकरनें आपला एक गरम कोट बाजारांत जाऊन पांच रुपयांना विकला. शिडी, बांस इत्यादि सर्व सामान आणलें. पण प्रेत एकटें नेणार कसें ? त्याचा उपाय तेथें थकला. कोण येईल ? त्याला अनंतशास्त्र्यांची आठवण झाली. रोशनचा नाच जेव्हां जेव्हां जयंतकडे झाला तेव्हां अनंतशास्त्री नेमानें हजर होता. आज जयंतला खांदा द्यावयाला बोलावणें जातांच अनंतशास्त्र्यानें खर्रकन् आपलें तोंड उतरविलें. यावयाची उत्सुकता दाखविली, पण उपाय नव्हता. घरीं पत्नी गरोदर ! पतीला प्रेताचा स्पर्श शास्त्राविरुद्ध आहे. पुत्रप्राप्तीसाठीं आज सतत वीस वर्षे नवस करणाऱ्या अनंतशास्त्र्याची बायको जयंत मेल्याबरोबर एकदम गरोदर असावी ! सुधाकर चिडला, निरुपायानें बाहेर आला. खिडकीवाटे अनंतशास्त्र्याचे शब्द त्याला ऐकूं आले. "आपल्या हराम संगतीनें त्याला जगांतून उठवला नि आतां फिरतो आहे आमच्याकडे खांदा मागायला! हा कां नाहीं मेला लेकाचा..."

सुधाकरचा चेहेरा कोमेजलेल्या फुलासारखा करपून काळाठिक्कर पडला. अनंतशास्त्र्याच्या मुखानें सारें जग त्याच्यावर निखारे फेकीत होतें. काय शोभा होती जगाची याचना करण्यांत ? दाणे संपलेल्या कणसाकडे पांखरें कशाला येतील ?

तो सरळ दारूच्या गुत्त्यावर गेला. जन्या, डोमा, निंब्या हीं पोरें तेथें नेहमींप्रमाणें बसलीं होतीं. त्यांना त्यानें बोलाविलें. तीं पोरें धावतच

आलीं. जयंतनें त्यांना कित्येकदा मदत केली होती. त्यांच्या अडीअडचणी जाणल्या होत्या.

सर्वांनीं मिळून तयारी केली. प्रेत शिडीवर ठेवून दोरी कडसून बांधतांना सुधाकर कळवळला. बाकीच्यांचे हात थरथरले. जयंतची प्रेतयात्रा निघाली. त्या कलावंताच्या हयातींत चोरून मारून कां होईना पण भोवतालीं जमणारे समाज-धुरीण नांवाला बट्टा लागेल म्हणून प्रेतयात्रेला हजर नव्हते. फुलझाड उकिरड्यावर वाढल्याबद्दलचा सात्त्विक संताप जगानें अशा रीतीनें व्यक्त केला होता. मुलांफुलांचें अंतःकरण असलेला जीवात्मा पापांत पिचून पिचून नाहींसा झाल्यामुळें पुण्यवान जग त्याच्यापासून दूर राहूं इच्छीत होतें.

सरण रचून झालें. अर्धीं लाकडें ठेवून झाल्यावर मध्यें प्रेत आणि वर पुन्हा लाकडें. प्रत्येक लाकूड ठेवतांना सुधाकर पाण्यापासून दूर झालेल्या मासळीसारखा तडफडत होता. प्रेताला त्यानें प्रदक्षिणा घातली, नमस्कार केला आणि सरण पेटविलें. जन्या, डोम्या, निंब्या देखील रडूं लागले. कोण कोणासाठीं रडतो !

कवटी फुटल्याचा आवाज झाला, लाल हिरवे जाळ उठले. आधि, व्याधि, उपाधि जळून खाक झाल्या. पापात्मा नाहींसा झाला म्हणून गांवच्या पुण्यवंतांनीं समाधानाचा निःश्वास टाकला ! “ अमुचा राम राम घ्यावा ” असें म्हणत चार दोस्त जगाच्या पाठीवर पांगले.

आजवर जवळ केलेल्या आशा–निराशांच्या राखेकडे पाहात जयंतचा आत्मा थोडा वेळ घुटमळला. ज्या ज्या गोष्टी त्यानें सोडलेल्या शरीराला प्रिय होत्या त्या त्या गोष्टींकडे त्यानें सतृष्ण दृष्टिक्षेप केला.

रोशनच्या घरावर त्यानें घिरट्या घातल्या. थकून भागून संत्रस्तपणें झोपलेल्या सुधाकरच्या केसांशीं तो खेळला. दारूच्या गुत्त्यालाहि त्यानें भेट दिली. तो जरी जगाला दिसत नव्हता तरी जग त्याला दिसत होतें.

सुधाच्या डोळ्यांतून झिरपणाऱ्या प्रेमांत त्यानें पुन्हा एकदा स्वरूप पाहिलें. तितकेंच मनोज्ञ आणि सुंदर होतें तें! जगांत मोठ्या म्हणून गाजलेल्या व्यक्तीलाहि हें सद्‌भाग्य लाभलें नाहीं.

तो वर देवाघरीं जावयाला निघाला. पापपुण्याच्या खतावण्या घेऊन देवदूत समोर निघाले. त्यांच्या मागून जयंत वर चढूं लागला. सारंगीचे सूर मनसोक्त ऐकून घेऊन ज्या जगानें शेवटीं त्याची सतार फोडून टाकली तेंच जग पुन्हा त्याला दुरून सुंदर दिसूं लागलें. वस्तु दुरूनच चांगल्या!

त्या जगांत अजूनहि वावरणाऱ्या त्याच्या सुधाकरविषयीं त्याची आसक्ति कमी झाली नव्हती. "माझा सुधा काय करीत असेल आतां?" हा प्रश्न त्यानें हजारदा विचारला आपल्या मनाला.

तो जसजसा वर जाऊं लागला तसतसें त्याचें आश्चर्य वाढत गेलें. आभाळाची नितळ पोकळी त्याला भुरळ पाडूं लागली. हिमालयाचीं शिखरें त्यानें पायांखालीं पाहिलीं. सारा उत्तरप्रांत ओलवणाऱ्या सिंधु, गंगा त्याला दुधाच्या धारांसारख्या दिसूं लागल्या.

जमिनीवरून एकमेकांना चिकटून दिसणाऱ्या चांदण्यांत हजारों मैलांचें अंतर असलेलें त्याला आढळून आलें. फुलासारखी दिसणारी कौमुदी अग्नीपेक्षांहि दाहक भासली. देवदूतांबरोबर जात असल्यानें त्याला आंच लागली नाहीं एवढेंच! ज्याच्यावर त्यानें आपल्या

काव्यांतून हजारों उपमा फुलविल्या, ज्या शीतल चंद्रिकेनें त्यानें आपलें काव्य स्निग्धसान्द्र केलें आणि ज्या दिव्य वातावरणाकडे पाहात तो सारें जग विसरत असे, त्याचें विश्वव्यापी स्वरूप...! विश्वाचा जगड्व्याळ पसारा पाहातांच अदृष्टपूर्व असें विराटरूप पाहून दृष्टव्याकुळ झालेल्या अर्जुनासारखी त्याची स्थिति झाली व आनंदानें उत्फुल्ल होतो न होतो तोंच भयानें ' प्रसीद देवेश ' म्हणून तो प्रार्थना करूं लागला.

समुद्राच्या पाण्यावरून ओसंडून चाललेल्या फेसासारखी चांदण्यांनीं खच्चून भरलेली आकाशगंगा. तिच्या दुग्धप्रवाहांत जणूं अप्सरा, यक्षकिन्नर विलास करीत आहेत ! फेसानें अधिकच शुभ्र दिसणाऱ्या अप्सरा पाहिल्याबरोबर आपले पंख पसरून तरंगलहरींवर हळूच झोके घेणाऱ्या राजहंसींची त्याला आठवण झाली व लागलीच त्यानें थोड्या वेळापूर्वी पाहिलेल्या मानस सरोवराकडे दृष्टिक्षेप केला.

तो वरवर जातच होता !

देवांच्या राज्याची तटबंदी दिसूं लागली. मोठा दरवाजा लागला. यमदूतांनीं नवीन येणाऱ्या मर्त्य जीवाचें नांव, गांव, पत्ता वगैरे नीट सांगितला आणि जयंत वर गेला.

सर्वत्र शांतता पसरली होती. दुरून मंदपणें मंजुळ आवाज ऐकूं येत होता. दीपमाला नसतांहि आसमंत प्रकाशांत न्हाऊन निघाला होता. सुंदर गीतालाप निघत होते. मधुर गीतें गाईलेलीं ऐकूं येत होतीं. स्निग्ध गंभीर घोष...पण काय ! कारणावांचून कार्य घडत होतें.

जयंत विस्मयानें आजूबाजूला पाहूं लागला. त्याला सगळेंच अभिनव आणि सुंदर वाटलें. त्यानें निरीक्षण सुरू केलें. येथें

आल्यापासून त्याची दृष्टि अत्यंत तीक्ष्ण झाली होती. कितीहि दूरचें त्याला दिसे आणि कितीहि लांबचा आवाज त्याला ऐकूं येई.

'स्वर्ग' एका मोठ्या दारावर सुवर्णाक्षरें लाविलीं होतीं. दाराचे सर्व खिळे हिऱ्या माणकाचे होते. त्यानें दाराच्या फटींतून आंत डोकावण्याचा प्रयत्न केला. गुलाबी प्रकाशांत सर्व लोक अमृतपान करीत होते.

"मला आंत जाऊं देतां का?" त्यानें द्वारपालाला सभ्यपणें प्रश्न केला.

"तुला? नि स्वर्गांत? एका पोरीच्या नादीं लागून आपल्या घरादारावर तूं तुळशीपत्र ठेवलंस त्याची नोंद आमच्याजवळ आहे. तुझ्यासारख्या पापी लोकांना आमच्या इथें परवानगी नाहीं."

"पण महाराज, माझी पत्नी, माझीं मुलंबाळं देखील मला तेवढींच प्रिय..."

"मला वाद नको आहे. पापी लोकांना आंत यायची बंदी करणं हें काम माझं. चल, बाजूला हो. बाकीच्या लोकांचा रस्ता अडवूं नकोस."

जयंत तेथून निघाला. फिरून त्यानें भटकण्याला सुरुवात केली. प्रत्येक दारावर तो जायचा आणि तेथून त्याची पापी म्हणून हकालपट्टी व्हायची. 'ह्या मूर्ख लोकांनीं मला मग जगांतून उठवून आणलं तरी कशाला जर ह्यांच्या जवळ जागा नव्हती तर?' असा त्याला प्रश्न पडला. जगाची त्याला आठवण होतांच त्यानें पृथ्वीकडे पाहिलें. जग अगदीं मुंग्यांसारखें उद्योगांत होतें.

पुन्हा तो एका दाराजवळ पोचला. द्वारपाळानें त्याच्याकडे निरखून पाहिलें व त्याला प्रश्न विचारला, " काय हवं आहे तुला ?"

" मला आंत जाऊं देतां का ? " अत्यंत सभ्यपणें व किंचित् केविलवाण्या स्वरानें जयंतनें विचारलें.

" तूं ? पण हो, तूं पापी असलास तरी जगांत तूं जिवंत असेपर्यंत तुझ्या तोंडून दुसऱ्याला बोंचणारा एकहि शब्द निघाला नाहीं. तुझी वाणी साखरेसारखी राह्यली. जा तूं आंत. देतों तुला मी परवानगी. पण एक गोष्ट मात्र नीट लक्षांत ठेव. एकदा आंत गेलास, कीं बरेच दिवस बाहेर यायला मिळणार नाहीं. तुला तुझ्या कलियुगाकडे पुन्हा एकदा पाह्यचं असल्यास सांग..."

ज्या जागेहून मृत्युलोक चांगला दिसेल अशा जागेकडे देवदूतानें बोट दाखविलें. जयंत तेथें जाऊन उभा राहिला. विश्वाच्या अनंतत्वाची कल्पना मनांत उभी राहातांच पृथ्वी वामनाच्या पायाखालीं कशी सामावली ह्याची त्याला कल्पना येऊं शकली.

आकाशांत उंच उडणाऱ्या घारीला आपलें घरटें जसें नेमकें दिसतें व आपल्या पिलांवर तिची दृष्टि चटकन् खिळते तद्वत् जयंतला पृथ्वीवर वावरणारा सुधाकर चटकन् दिसला. तो एकटाच भटकत होता. उन्हानें काळवंडलेल्या आणि निराशेनें करपलेल्या त्याच्या मुखाकडे पाहून जयंत कळवळला, " अरेरे, सुधाकर माझ्याकरतां वेडापिसा झालेला आहे." हे शब्द उच्चारतांना त्याचा कंठ दाटून आला. सुधाकर हळूहळू आपल्याच तारेंत म्हणत होता. ती जयंताची कविता होती—

# मृ त्यू ची कृ पा

माल्सर्याचा भरला वारा, अहंपणाचा सर्व पसारा ।
अज्ञानाची मिरवे द्वाही, रसिकत्वाला थारा नाहीं ।
काय अशा जनतेंत रहावें, काय पहावें, काय चहावें ?
बरें राहणें निर्जन रानीं, ओढ्यासंगें गाणें गाणीं ।
या परि वैतागून कवीनें, ओसाडींत स्वच्छंदानें ।
वाजविला जो सुस्वर पावा, त्याचा कां द्दा वास
असावा ? ॥ १ ॥

बाजार करून घरीं परत चाललेल्या एका माणसाचें सुधाकरकडे लक्ष गेलें. भाजीची पिशवी नीट धरून तो सुधाकरला म्हणाला, " परवां जो कुणी वारल्याचं वर्तमानपत्रांत आलं त्याचाच ना तूं मित्र ? "

" होय, काय काम आहे आपलं ? " सुधाकरनें उत्सुकतेनें विचारलें.

" नाहीं अगदीं सहज. त्याचा दोस्त राहाण्यासारखा दिसलास म्हणून सहज चौकशी केली. तुझ्या त्या कवींत एक तरी गुण होता का रे ? "

" महाराज, जगाला संदेश दिले आहेत त्यानें ! "

" अहाहा, काय त्याचं दिव्य चारित्र्य पण ! नि तो म्हणे आम्हांला संदेश देणार ! "

सुधाकरला फार वाईट वाटलें पण काय करणार ? त्या गृहस्थाच्या पिशवींत असलेल्या केळ्यांच्या फणीकडे त्याचें लक्ष गेलें. तो म्हणाला, " कशाच्या उपयोगीं आहेत हो हीं केळीं ? "

" वेड लागलं कीं काय तुला ! लोक केळीं कशासाठीं आणतात एवढंहि कळत नाहीं तुला ? "

" मूर्खा, वेड तुला लागलंय. मासळ्या सडवून जिथें खत पुरवलं जातं त्या केळबनांतील केळीं मात्र तुला बनतात नाहीं का ? "

" कोण बोलेल तुझ्याशीं ! खातांना ह्या गोष्टी मनांत आणायच्या असतात का ? नि असल्या घाणेरड्या गोष्टी सुचतात तरी कशा तुला ? संगतीचा परिणाम. दुसरं काय ! "

हा सर्व प्रकार पाहून जयंत आनंदला. सुधाकरबद्दलचा त्याचा अभिमान शतपटीनें वाढला. विस्मयगर्भ दृष्टीनें तो जगांतील एकन् एक दृष्य पाहात होता. क्षणाक्षणाला त्याचा चेहेरा बदलायचा. कधीं तो गंभीर दिसे तर कधीं त्याचें तोंड उतरे. कधीं हर्षाचा फुलोर त्याचा चेहेरा खुलवून टाकी तर कधीं तो शांतपणें हातावर हनुवटी टेकून बसून राही.

" भल्या माणसा..." तो द्वारपाळाचा आवाज होता. तो त्याला हाक मारीत होता. " इथें काय बसला आहेस मघांपासून. अजून जगावरची दृष्टि उचलावीशी वाटत नाहीं तुला ? मृत्युलोकांत असतास तर एवढ्या वेळांत कित्येक वर्षं तुझीं निघून गेलीं असतीं तुझीं..."

स्वर्गांतले घटिका तास जगाच्या कालमानांत वर्षांनीं मोजले जातात हें जयंतच्या लक्षांत आलें, पण फारच थोडा वेळ. आणि पुन्हा तो खालचीं दृष्यें पाहूं लागला.

" अरे चल. दूधगंगेंतून स्नान करून अप्सरा आलेल्या आहेत.

आतां लवकरच नृत्याला सुरुवात व्हायची आहे." द्वारपाळानें त्याला पुन्हा बोलाविलें.

" होऊं द्या सुरुवात. नाचरंग मीं जगांतच पाह्यले आहेत. मला त्यांची भूक मुळींच राह्यली नाहीं. इथें पाहा किती सुख आहे तें." त्यानें द्वारपाळाला आपल्याजवळ बोलाविलें व तो त्याला मृत्युलोक दाखवूं लागला, " तें पाहा तिकडे."

नदीच्या वाळवंटीं सायंतान्याच्या स्निग्ध प्रकाशांत चारपांच तरुण मंडळी जमली होती. पांखरें आपापल्या घरट्यांत गेलीं होतीं. वातावरण नीरव होतें.

" नाना, पुन्हा म्हण एकदा ती जयंतची कविता." नाना कविता म्हणूं लागला.

" असतां आनंदाची माया
वृद्धि क्षणभर तिची कराया
लागे ज्याचा तोच गावया
आनंदाला द्विगुणित करिती आनंदाचे बोल—"
परंतु जेथें उदासीनता
व्याकुळ करिते विषण्ण चित्ता
तिथेंच त्याला द्याया समता
गाणें गावें हेंचि अमोलिक ईश्वरतेचें काम ॥ २ ॥

एवढें म्हणून नाना थांबला. मंडळी निस्तब्ध झाली.

" अरेरे, जिवंत होता तोंवर त्याला कुणीं सुख लागूं दिलं नाहीं. मन मानेल तसा त्याचा छळ केला!"

" कुणाचा छळ केला नाहीं जगानें! पण तो छळहि एकापरी

त्यानेंच ओढून घेतला. माणूस गेला. छळ संपला. आतां तर जग त्याच्या कविता वाचतं ना? शरीराचा छळ झाला. जयंतलाहि त्यामुळें फारसं वाईट वाटलं नसेल. त्याची कविता पुजतं आहे ना जग?"

सर्व पाहाणाऱ्या व ऐकणाऱ्या जयंतनें हर्षोत्फुल्ल नेत्रांनीं एकदा देवदूताकडे पाहिलें. पुन्हा तो दुसरें दृश्य त्याला दाखवूं लागला—

चाफ्याच्या पाकळीसारखी सुकुमार असलेली एक तरुणी विमनस्कपणें खिडकींत बसली होती. गौरीकरितां फुलांच्या परड्या घेऊन लहान लहान मुली आपल्याच आनंदांत चिमण्यांसारख्या चिवचिवत रस्त्यानें चालल्या होत्या. तरुणीचें तिकडे मुळींच लक्ष नव्हतें. ती हातांतील पुस्तकाकडे नजर लावून उसासून म्हणत होती,

"वागविली निज हृदयप्रांतीं
भक्तीनें रमणाची मूर्ति
भजली अर्पण करून त्याला
प्रेमाच्या पुष्पांची माला.
काय होय तें परि पुरुषाला
नव पुष्पावरच्या......" ॥ ३ ॥

पुढचे तिचे शब्द हृदय पिळवटून निघालेल्या हुंदक्यांत विलीन झाले.

"बाला भग्न-मनोरथ झाली
मौक्तिकांपरी अश्रू ढाळी.
दुःखानें एकाकी स्फुंदे
काय तेंच या स्थानीं गंधे?" ॥ ४ ॥

हें म्हणतांना तिला किती तरी दिलासा मिळत होतासा दिसला. प्रत्येक शब्दाबरोबर तिचा जीव हलका होत होता. सहसंवेदनेचा तो आनंद होता !

जयंतनें तिसऱ्या दृश्याकडे बोट दाखविलें, "तिकडे पाहा आतां..." तो देवदूताला म्हणाला.

पहाटेच्या प्रसन्न वातावरणांत आपल्या खड्या सुरानें स्वयंसेवकांची एक तुकडी जगाला जागवीत रस्त्यानें जात होती. प्रत्येक शब्द तोलून म्हटला जात होता.

"अवधि न उरला मांगल्याची लग्नघटी भरली–"

जगाचे व्यवहार सुरळीत चालले होते. कोणी एखादा मध्येंच लकेर मारायचा आणि ती आपल्या काव्याची आहे असें जयंतला आढळून आलें, कीं त्यानें देवदूताला त्याबद्दल सांगायचें असा क्रम कित्येक तास चालला होता.

"वृंदावनीं तुज भेटेल माधव नीट सरळ जा या वाटेनें ।
दिसतिल तुज हरिचरण उमटले यमुनेच्या कांठा-कांठानें" ॥ ५ ॥

"ही कविता मीं..."

"थांब, मध्यें बोलूं नकोस. ती बाई पाहा काय म्हणते तें..." जयंतच्या तोंडावर देवदूतानें हात ठेवला. त्याचेंहि मन रमलें होतें. त्याला हा सर्व पहिलाच अनुभव होता. प्रेमाच्या ठरलेल्या गाण्यांशिवाय त्यानें अप्सरांना कांहींहि म्हणतांना ऐकलें नव्हतें. देवदूत खालून येणारे आवाज एकाग्रतेनें ऐकत होता.

" सांगितलेल्या कामाचा, दिलेल्या तुकड्यावरी
कुंकवाचा धनी माझ्या खाजगीवर चौधरी
सोन्याची पुतळी पोर सोनें पेरुनि परणिली
देह गेला स्मशानांत उरली घरीं साउली
आली वेळ विवाहाची नांवाचा पति जाहला
चितेच्या पूजनासाठीं सतीचा आहुती दिला–" ॥ ६ ॥

आपल्या जीवाच्या आंतल्या गाभ्यांतून आपण आलाप काढावा आणि तो ऐकून सर्वांच्या चित्तवृत्ति तल्लीन व्हाव्यात, त्यांच्या सुखदुःखांना पाझर फुटावा व त्यांचे झरे सुरू होऊन जगाचा थोडा वेळ विसर पडावा...

जयंतच्या डोळ्यांतून त्याचें अंतःकरण झिरपत होतें. ते अश्रु त्याच्या सुकलेल्या चेहेऱ्यावर तिसांजीच्या काजव्यासारखे चमकले !

देवदूत गहिंवरून दयेनें त्याच्याकडे पाहूं लागला. " किती वेळ बसणार तूं इथें आतां ?"

" नक्का हो, मला आंत नेऊं नका. आंत जें आहे तें सारं मी भोगून आलों आहें नि तें इथें भोगायचं सोडून मृत्युलोकीं भोगल्याबद्दल जगानें माझा तिरस्कारहि केला आहे. नयनांचा एवढाच सोहळा काय तो राह्यला होता. नको मला तुमच्या स्वर्गातलं दालन. तें पाहा...पाहा तर जरा..."

जयंत आपली भुकेली दृष्टि जगांतील दृश्यांकडे लावून बसला होता. पर्याकुल, पर्यत्सुकतेमुळें त्याचे ओठ विलग झाले होते. आवेगानें त्याचा कंठ मधून मधून भरून येत होता !

आकाशगंगेंतून विलास करून उल्लसित झालेल्या गंधर्वांनाहि त्याच्या ह्या सुखाचा हेवा वाटला. स्वर्गाचें दार उघडेंच टाकून ते त्याच्याकडे क्षणभर पाहात राहिले.

जयंत स्वर्गांत होता !

त्याचें यशःशरीर तेजःपुंज दिसत होतें !

नागपूर
५.९.३५
पहांटे ४ वाजतां

## ।१८। मा रे वा ली ।

हिरव्या कोवळ्या गवताचा भारा डोक्यावर घेऊन मुलिया आली त्या वेळीं तिचा गव्हासारखा रंग जास्तच लाल झालेला दिसत होता. तिच्या डोळ्यांत त्यांची विशालता आणि मादकपणा ह्यांनाहि मागें टाकणारी एक प्रकारची उबग भरली होती. महावीरनें तिचा तो नूर पाहून हळूच विचारलें,

" कां ग, काय झालं तुला आज ? "

मुलियानें उत्तर दिलें नाहीं; पण तिचे डोळे मात्र टचकन् भरून आले. तें पाहून महावीर तिच्याजवळ आला व हलकेच म्हणाला,

" मुलिया, मलाहि नाहीं का सांगत तूं ? कुणीं कांहीं म्हटलं का तुला ? आई रागावली का ? तूं अशी उदास कां आहेस ? सांग ना."

तिनें एक उसासा टाकला आणि उत्तर दिलें, " कुठें काय झालंय ? ठीक तर आहे सारं ! "

महावीर तिच्याकडे पाहातच राहिला. पायांपासून मस्तकापर्यंत त्यानें तिला नीट न्याहाळलें आणि जरा रोषांत विचारलें,

" तूं अशीच रडशील, पण मला मात्र सांगणार नाहींस ! "

पण मुलियाच्या मनांत सांगावयाचेंच नव्हतें. पुन्हा एकदा तिनें

वेगळेंच निमित्त केलें, " कांहीं असेल तर ना ! सांगूं काय ? "

* * *

मुलिया म्हणजे एक गुलाबाचें फूल होतें. तिचा गहुला रंग, हरणासारखे डोळे, हनुवटीची ठेवण, गालावरील रक्तिमा, मोठ्या सुंदर व अणीदार पापण्या, डोळ्यांत नेहमीं दिसणारी आर्द्रता, एक प्रकारची स्पष्ट वेदना—एक प्रकारची मूक व्यथा ! त्या चांभाराच्या घरीं ही अप्सरा कशी आली, देव जाणे ! काय तिच्या नशिबांत हेंच होतें, कीं त्या फुलराणीनें गवताचा भारा डोक्यावर घेऊन बाजारांत उभें राहावें ? त्याच गांवांत असे कित्येक लोक होते, कीं ज्यांनीं तिचे पाय डोक्यावर घेण्यांत धन्यता मानली असती; ज्यांना तिच्या एका कटाक्षांतहि स्वर्गसुख लाभलें असतें; ज्यांच्याशीं केवळ एक शब्द बोलून ती त्यांच्या जिवाची मालकीण होऊं शकली असती.

परंतु तिला त्या गांवांत येऊन एक वर्ष होत आलें होतें तरीहि तिनें कोणाकडे पाहिलें, किंवा कोणाशीं चार दोन शब्द ती बोलली असें पाहाण्यांत काय, पण ऐकिवांत देखील नव्हतें. ती गवत घेऊन निघाली कीं असें वाटायचें, जणूं हेमरंजित उषा आपला प्रकाश उधळीत चालली आहे ! तिला पाहातांच कोणाच्या तोंडून गझल बाहेर पडत, कोणाचे हात आपोआप छातीवर येत; आणि मुलिया कोणाचीहि दरकार न बाळगतां आपल्या रस्त्यानें जात असे. लोकांनीं चिडून जळफळत म्हणावें, " काय दिमाख आहे पाहा ! त्या महावीर-मध्यें तिला असें काय दिसतें ? दिसायला देखील तर तो धड नाहीं. कशी नांदते त्याच्याबरोबर कुणास ठाऊक ! "

तथापि आज मात्र खरोखरच कांहींतरी विशेष घडलें होतें. ती घटना अशी होती, कीं जिच्यामुळें तिच्या स्थितींतील तरुणींना एक संधि—एक दिलासा मिळाला असता. मुलियाला मात्र तो वज्राघात वाटला.

सकाळची वेळ ! आंब्याला मोहोर आला होता आणि त्याच्या उन्मादानें सुगंधून गेलेला वारा स्वैर वाहात होता. आभाळांतून जमिनीवर सोनें सांडत होतें. मुलिया नुकतीच डोक्यावर चुंबळ घेऊन गवत कापायला निघाली होती. सकाळच्या सोनेरी किरणांनीं तिचा रंग अधिकच चांगला दिसत होता.

आणि ती रस्त्यानें चालली होती...

तिला समोरून कोणीतरी झरझर येत असल्याचा भास झाला. तो गोवर्धन होता. त्याला टाळून जावें असें तिच्या मनांत येण्यापूर्वींच गोवर्धननें पटकन तिचा हात धरला आणि विवश होऊन तो म्हणाला, “ मुलिया, माझी तुला अगदींच दया येत नाहीं का ? ”

मुलियाला यत्किंचित्‌हि भीति वाटली नाहीं. तिला संकोचहि वाटला नाहीं. थोड्या वेळापूर्वीं फुलाप्रमाणें दिसणारा तिचा चेहेरा आतां ज्वालेप्रमाणें अंगार दिसूं लागला. तिनें त्याच्याकडे विस्तव फेकीत पाहिलें व म्हटलें, “ सोड मला, नाहीं तर पाहा मी ओरडत्यें. ”

हा चंडिकेचा अवतार म्हणजे गोवर्धनच्या आयुष्यांत एक नवें दृश्य — एक नवीन अनुभव होता. गरिबांना सौन्दर्य असलें, जवानी असली, कीं ती त्यांनीं मोठ्या कुळांतल्या माणसांना खेळायला दिली पाहिजे. गोवर्धननें आजपर्यंत अशीं कितीतरी खेळणीं मिळविलीं होतीं; कितीतरी मार्के जिंकले होते.

पण आजचा प्रसंग...! तो मुलियाचा क्रोध, तो दिमाख — एकदम त्याचे छक्केपंजे सुटले. शरमेनें चूर होऊन त्यानें तिचा हात सोडून दिला. मुलिया पुढें निघून गेली.

ती निघून गेली, पण तिचें मन ? संघर्षाचा दाह जखमेसारखा जाळीत नाहीं. मागून तो वितळत जातो. चार पावलें दूर जातांच तिचें मन भारावून गेलें. भीतीमुळें, स्वतःच्या असहायतेमुळें तिच्या डोळ्यांत आसवें दाटून आलीं. संयम करण्याचा वृथा प्रयत्न तिनें सोडून दिला व उसासून उसासून ती हुंदके देऊं लागली. तिच्या मनांत आलें, " आज आपण दरिद्री नसतों, कमकुवत नसतों तर कोण धजावता आपला असा अपमान करायला ? " हातानें गवत कापतां कापतां तिचें हृदयहि कापलें जात होतें आणि डोळ्यांवाटे जणूं रक्त गळत होतें.

पण करणार तरी काय ? एकदा अशीहि कल्पना तिच्या मनांत आली, कीं हें सारें महावीरला जाऊन सांगावें. पण नको, त्याच्या कानांवर गेलें, कीं गोवर्धन ठाकूर रक्तानें न्हाऊन निघेल; आणि ! गरिबांची कल्पनाशक्ति ! पुढील परिणामाच्या व्यथेनें तिचें आंग शहारून आलें. मघाशीं महावीरच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याची तिनें टाळाटाळ केली ती ह्याचमुळें ! जीव जळत होता तरी तिनें त्याला कांहीं एक सांगितलें नाहीं.

दुसऱ्या दिवशीं गवताला जायला कांहीं केल्या तिचें मन धजेना. सासू आली आणि विचारूं लागली, " तूं कां नाहीं जात गवताला ? साऱ्याजणी तर केव्हांच निघून गेल्या. "

" मी एकटी जाणार नाहीं. " मुलियानें नमतें घेतलें.

सासू एकदम गरम झाली, " रस्त्यावर वाघ बसले आहेत कीं काय तर तुला घेऊन जातील ? "

अधिकच हलक्या आवाजांत मुलिया म्हणाली, " सर्वजण मला रस्त्यांत छेडतात. "

पण ह्या वाक्याचा परिणाम मात्र उलट झाला. सासूनें दोन चार आणखी सुनावल्या. "सर्व बायका गेल्या तेव्हां तूं गेली नाहींस. एकटी राह्यलीस तरी जात नाहींस. तेव्हां असंच कां नाहीं सांगत, कीं तुझ्या मनांतून जायचं नाहीं म्हणून ? राणीसरकार राहून माझ्या इथें नाहीं निभणार. माझं काय, साऱ्यांचंच तसं. कामानें माणूस गोड होतं. रूपाचं काय ? असशील तूं सुंदर ! पण मला कांहीं उपयोग त्याचा ? ऊठ, घे तो कोयता नि जा गवताला. "

दारालगतच्या लिंबाच्या झाडाखालीं महावीर घोड्याला खरारा लावीत होता. त्यानें पाहिलें, मुलिया खिन्न, उदास, सुकलेली आहे. साऱ्या गोष्टी जर त्याच्या स्वाधीन असत्या तर त्यानें तिला आपल्या काळजांत लपविली असती; आपल्या पापण्यांखालीं तिला झाकून घेतली असती.

पण गवत नाहीं तर घोड्याच्या पोटाला घालणार काय ? आणि विकत घ्यायचें तर रोज बारा आणे आणावे कोठून ? कसे तरी हटातटानें दीड दोन रुपये मिळतात. कधीं मिळतात, कधीं मिळतहि नाहींत. लोकांना मोटारी लॉऱ्या स्वस्त पडतात. दीडशें रुपयांचें कर्ज डोक्यावर. व्याजहि देऊन होत नाहीं दरवर्षी. मग मुद्दलाची गोष्ट किती तरी दूर !

अशा प्रकारचे विचार भराभर गोंधळ घालून गेले आणि म्हणूनच

मुलियाला तो वरवरच म्हणाला, “ तुझ्या मनांत नाहीं तर राहूं दे. पाहून घेऊं ! ”

पण ह्या उद्‍गारांनीं कितीतरी काम केलें. किती बरें वाटलें मुलियाला. तिलाहि धीर आला. “ पण जनावर खाईल काय मग ? ” ह्या तिच्या स्वतःच्याच वाक्यानें तिला असें वाटलें, आपण आपल्या पतीच्या विचारांनाच साद घातली. ती अगदीं निवल्यासारखी झाली.

तिनें रोजचा रस्ता सोडून दिला व शेताच्या कांठाकांठानें ती जाऊं लागली. शंकित मनानें वारंवार ती आजूबाजूला पाही. ती ज्या पांधणींतून चालली होती तिच्या दोन्ही बाजूला उसांचे मळे होते. जरा कोठें खुट्ट झालें, कीं तिच्या नाड्या थंड पडत. “ कुणी उसांत तर नाहीं ना लपून बसणार ? ” तिची भीति तिला भेडसावूं लागली.

उसांच्या मेरी गेल्या. आंबराई पार झाली. बागायतीचा भाग लागला. शेताशेतांतून विहिरींवर मोटा चालल्या होत्या. शेताच्या धुऱ्यावर हिरवें गवत उगवलें होतें. मुलियाच्या तोंडाला पाणी सुटलें. ‘ इथें अर्ध्या तासांत जेवढं गवत घेतां येईल तेवढं पठारावर दुपारपर्यंत सुद्धा मिळणार नाहीं. इथें कोण येतंय पाह्यला ? कुणीं फटकारलं तर चालतं व्हावं. ’

खालीं बसून ती तेथलेंच गवत कापूं लागली. एका तासांत तिचें ओझें अर्ध्यापेक्षां जास्त भरलें. इतक्या जलद आणि इतक्या एकतानतेनें ती आपलें काम करीत होती, कीं गोवर्धन केव्हांपासूनचा तिच्या मागें येऊन उभा राहिला तें तिला कळलें देखील नाहीं. थोड्या वेळानें तिला आहाट ऐकूं आली. तिनें वर पाहिलें मात्र…!

तिचे प्राण सुकून गेले. " आतां इथेंच हें पोतं उपडं करावं नि धूम ठोकावी. "

गोवर्धन हें ओळखून होता. तो चटकन म्हणाला, " भिऊं नकोस मुलिया. ईश्वर साक्ष आहे; मी तुला कांहीं देखील म्हणणार नाहीं. तुला हवं तेवढं गवत घे. शेत माझंच आहे. "

मुलियाच्या हातांतील कोयता हातालाच चिकटून बसला. तिच्या दृष्टीला गवतहि दिसेनासें झालें. तिला मनापासून वाटलें, आतां ही धरित्री दुभंग व्हावी व आपण तिच्यांत गडप व्हावें. तिच्या समोरची जमीन उचलून तिच्या डोळ्यांसमोर तरंगूं लागली.

किंचित् पुढें होऊन गोवर्धन म्हणाला, " कां ? थांबलीस कां ? आजचीच काय, पण तूं रोज इथें आलीस तरी रोज मी तुला भारा देत जाईन. "

मुलिया दगडासारखी स्थिर बसून राहिली.

" तूं मला इतकी भितेस कां ? तुला काय वाटतं, आजहि मी तुला त्रास द्यायलाच आलों आहें ? शपथपूर्वक सांगतों, काल सुद्धा तुला छेडावं असा माझा उद्देश नव्हता. तुला पाहून माझ्यानें राहावलंच नाहीं. माझी शुद्धच हरपली होती. तूं तर काल निघून गेलीस पण मी मात्र कितीतरी वेळ तिथें उभा होतों. असं मनांत येई, आपला हात कापूनच टाकावा. आपण विष पिऊन मरून जावं. कालपासून तुला मी शोधतों आहें. आज तूं ह्या रस्त्यानें आलीस. मी तुझा माग काढीत आलों. तुला जी शिक्षा योग्य वाटेल ती तूं मला दे. तुला माझा प्राण घ्यायचा असेल तरी माझी ना नाहीं. मुलिया, खरंच एके काळीं मी बेरड होतों; परंतु ज्या

क्षणीं मीं तुला पाह्यलं, त्या वेळेपासून एकच इच्छा मनांत राह्यली. मी कुत्रा असतों तर तुझ्या मागें मागें फिरलों असतों; जनावर झालों असतों तर तुझ्या हातचा चारा खायला मिळाला असता. कसंहि करून तुझ्या कामास पडावं हीच मनीषा आहे. माझ्या तारुण्याचा सत्यानाश होईल मुलिया, जर मी हें कपटानें म्हणत असेन तर. तो महावीर बिचारा भाग्यवान, ज्याच्या पदरीं तुझ्यासारखी देवता पडली."

मुलियानं तें सारें खालच्या मानेनें ऐकून घेतलें आणि वर पुन्हा साळसूदपणें विचारलें, "तर मी काय करावं अशी तुमची अपेक्षा आहे ?"

"केवळ तुझी दया..."

हा उद्गार ऐकतांच एकदम तिनें मान वर करून त्याच्याकडे पाहिलें. तिची लाजलज्जा सारी पळून गेली. तिच्या नजरेंत खोंच भरली होती.

"तुम्हांला वाईट वाटणार नसेल तर एक गोष्ट विचारत्यें. तुमचं लग्न झालं आहे का ?"

"होय, झालं आहे माझं लग्न. पण...आहे आपला कांहींतरी खेळखंडोबा."

हें वाक्य ऐकतांच तिच्या डोळ्यांत अवहेलनेची, तिरस्काराची छटा उमटली.

"तुमच्या लग्नाचा खेळखंडोबा झाला आहे ना ? ठीक ! पण तरी देखील तुमच्या घरवालीशीं माझ्या माणसानें अशी लगट केली असती तर तुम्हांला काय वाटलं असतं ? तुम्हीं त्याच्या

नरडीचा घोट घेतला असता ना ? सांगा ! तुम्हांला काय वाटतं, माझा नवरा जातीनें चांभार झाला म्हणून त्याच्या नसांत रक्त नाहीं ? त्याला मर्यादेची चाड नाहीं ? माझं रूप तुम्हांला आवडलं, होय ना ? कां, बाजारांत माझ्यापेक्षां सुंदर बायका नाहींत ? त्यांच्या तळव्याची देखील बरोबरी करतां येणार नाहीं मला. मग त्यांच्याकडून कां नाहीं दयेची याचना करीत ? त्या नाहीं का दया करणार ? पण तिथें एक आहे ना ? तिथें जातांच तुमची छाती धडकते ! माझ्याजवळ भीक मागतां, कारण मी चांभारीण आहें. हलक्या जातींत माझा जन्म झाला आहे. एवढीशी लालूच दिली, थोडासा धाक दाखवला, कीं चटकन राजी होईन ही तुमची कल्पना ! किती सस्ता पडला सवदा ? जातीचे ठाकूर ना तुम्ही ? "

गोवर्धन शरमिंदा झाला. " मुलिया, असं नाहीं. मी उच्च नीच हा भेद मानला नाहीं. हवं तर तुझ्या पायांवर डोकं सुद्धा ठेवायला मी तयार आहें..."

" हं, तें फक्त एवढ्याचकरितां, कीं मी तुमचं कांहीं करूं शकत नाहीं. एखाद्या जहांबाज बाईच्या पायांवर डोकं ठेवून पाहा मग तें जाग्यावर राहातं किंवा कसं..."

गोवर्धनचें तोंड काळें ठिक्कर पडलें. तें इतकें, कीं जणूं तो आतांच एका मोठ्या आजारांतून उठला आहे. त्याला शब्द पण सुचत ना. मुलिया ??...आणि इतकी वाक्चतुर ???...

" मी रोज बाजारांत जात्यें. मोठमोठ्या घरीं काय गोंधळ चालतात तें मला ठाऊक आहे. असं एक घर मला दाखवा, कीं ज्या घरीं कुणी आचारी, गुजराथी, नोकर, चाकर शिरला नाहीं.

ह्या मोठ्या घरांच्या लीला आहेत. नि हें पण तुम्हांला सांगत्यें, कीं त्या बायका जें करतात तेंच योग्य आहे. कारण त्यांचीं माणसं तर हीं अशीं चांभारणींवर जीव ओवाळीत फिरतात. बेरीज वजाबाकी बरोबर होते...

" गरीब माणसांकरितां कुठल्या ह्या गोष्टी ? माझ्या महावीरकरितां संसारांत जें काय आहे तें सारं मी — माझ्यांत आहे. तो नाहीं कधीं कुणा बाईबापुडीकडे डोळे वाकडे करून पाहात. मी सुंदर आहें ही केवळ योगायोगाची गोष्ट ! पण मी जरी कुरूप असत्यें तरी त्यानें मला असंच वागवलं असतं. माझा विश्वास आहे त्याच्यावर. मी चांभारीण असल्यें तरी इतकी नीच नाहीं, कीं विश्वासाचा मोबदला मी बेइमानीनें देईन ! तुम्ही माझ्या रूपाचे मतवाले आहांत; उद्यां समजा मला देवी निघून आल्या, समजा मी आंधळी झाल्यें, तर तुम्ही माझ्याकडे ढुंकून सुद्धा पाहाणार नाहीं. पण माझा महावीर मला असंच खेळवील, अशीच माझी सेवाचाकरी करील. तुम्हांला वाटतं, त्याच्याशीं मी कपट करावं, नाहीं ? जा, गोवर्धन ठाकूर, आपल्या वाटेनें परत जा नि असे माझ्या मागें लागूं नका. परिणाम चांगला व्हायचा नाहीं. "

* * * *

तारुण्याच्या उन्मादांत काय नसतें ? त्यांत घमेंड असते, निर्दयता, स्वार्थ, प्रौढी, विषयवासना — जें जें म्हणून जीविताला अधःपाताकडे खेचून नेईल तें तें सारें असतें. गोवर्धनचा उन्माद मुलियानें पार उतरवून टाकला. उतास जात असलेल्या चांचणींत पाण्याचे थेंब टाकले म्हणजे फेस नाहींसा होतो व शुद्ध पाक तयार होतो. गोवर्धनचा

उन्माद गेला आणि तारुण्य राहिलें — आणि तारुण्यांत काय नसतें? जोम, बल, दया — जें जें म्हणून जीविताला पावित्र्य, सार्थकता मिळवून देईल तें तें सारें असतें!

त्या दिवसापासून गोवर्धन माणसांत आला. पूर्वी राग त्याच्या नाकाच्या शेंड्यावर असे. एवढ्या एवढ्याशा कारणासाठीं तो शेतावरच्या मजुरांना दाटायचा, मारायचा, शिव्या द्यायचा...

आणि म्हणूनच त्याच्या स्वभावांतला बदल म्हणजे सर्वांना एक आश्चर्याचा विषय होता!

एके दिवशीं गोवर्धन सायंकाळीं वावरांत गेला. बांध सुरू होता. परंतु एके ठिकाणची नाली फुटून पाणी बाहेर चाललें होतें. आज पूर्वीचा गोवर्धन असता तर बांधावर काम करणाऱ्या बायका आपल्या घरीं सुखरूप परत गेल्या नसत्या. आज मात्र ती नाली त्यानें स्वतः बंद केली व शेतांत जाऊन त्या बायांना म्हणाला, "तुम्ही इथें बसल्या आहांत नि पाणी मात्र दुसरीकडे वाहात चाललं आहे."

म्हातारी घाबरली. चटकन तो बांध नीट करायला उठली. भीतीनें तिचे प्राण सुकून चालले होते.

"अग, घाबरूं नकोस, मीं बंद केली आहे नाली. हं, कसं काय चाललं आहे तुझं? तुझा म्हातारा बरेच दिवसांत दिसला नाहीं. कांहीं कामधंदा आहे कीं नाहीं त्याला?"

"आजकाल तर वाईलपणच आहे दादा."

"तर मग त्याला इकडे पाठवून दे. ताग पडला आहे तिथें. थोडी दोरी तरी वळेल." आणि असें म्हणत असतांनाच तो निघून गेला.

* * * *

असेंच एकदा त्याला कचेरींत जावयाचें होतें, म्हणून त्यानें आपला घोडा कसला. परंतु उन्हाचा त्रास होईल ह्या भीतीनें टांग्यांतून जावयाचें ठरवून महावीरला बोलावणें पाठविलें. टांग्यांत बसून तो नऊच्या सुमाराला निघाला खरा, परंतु बसत असतांनाच त्याला एक प्रकारची किळस वाटली. घोडा अगदीं जरत्कारू, गाद्या मळून गेलेल्या, टांगा खटारा झालेला ! त्यानें महावीरला विचारलें,

"कां रे, तुझा घोडा तर असा कधींच नव्हता..." महावीरनें आपल्या दुर्दैवाचा, दैन्याचा पाढा वाचला. शेवटीं तो म्हणाला, "विचार करतों आहें, गिऱ्हाईक मिळालं तर टांगाघोडा विकून टाकावा. मोलमजुरी करून पोट भरलं तर ही खटखट तरी जाईल."

गोवर्धनचें लक्ष त्याच्या चिंध्या झालेल्या सदऱ्याकडे गेलें. "मग कुठें दोन चार बिघे जमीन कां नाहीं घेत?"

"शेती करायची मगदूर आहे कुणांत? त्यापेक्षां मोलमजुरी बरी. हा टांगा एकदा विकला गेला, कीं मग गवत विकीत जाईन. आजकाल घरवाली नि म्हातारी दोघीहि गवताला जातात तेव्हां कुठें पोट निभतं..."

"तर मग बाजारांत म्हातारी जात असेल नाहीं?..."

"तिच्यानें कुठें इतक्या दूर जाऊन होतं? घरवालीच जात असते. दुपारपर्यंत गवत कापते, तीन प्रहरीं बाजारांत जाते. झालझूल पडल्यावर घरीं येते. थकून जाते बिचारी. पण नशिबापुढें इलाज नाहीं..." हें बोलतांना महावीर अगदीं वरमल्यासारखा होता.

कचेरी येतांच महावीरला पांच वाजतां यावयाला सांगून गोवर्धन

खालीं उतरला. महावीर देखील 'सवारी' मिळेल ह्या आशेनें शहराकडे निघाला.

कचेरीच्या आवारांत पानविडीचीं दुकानें होतीं. थोड्या अंतरावर एका मोठ्या झाडाच्या सावलींत पुष्कळसे टांगे, मोटारी, बग्या उभ्या होत्या.

गोवर्धनचें काम चार वाजतां संपलें. त्याच्या मनांत विचार आला, एखादी लॉरी जर मिळेल तर शहरांतून चक्कर मारून यावें व म्हणून शोधक दृष्टीनें इकडे तिकडे पाहात तो एका विड्यांच्या दुकानांत उभा राहिला, तोंच त्याची दृष्टि एका भारेवालीवर गेली. डोक्यावर एक मोठा गवताचा भारा घेऊन ती खिदमतगाराशीं हुज्जत घालीत होती. त्यानें तात्काळ ओळखलें, अरे ही तर मुलिया! मोठ्या ऐटींत एक गुलाबी साडी नेसून ती टांगेवाल्याशीं मोलतोल करीत होती. एका काळ्या, कुरूप टांगेवाल्यानें साद दिली,

"मुलिया, तुझा भारा तर सहा आण्यांपेक्षां जास्त किंमतीचा नाहीं..."

मुलियानें आपल्या डोळ्यांतला उन्माद जणूं त्याच्याकडे फेकून दिला, "सहा आण्यांचा हवा असेल तर त्या बाजूला बाया बसल्या आहेत त्यांच्याकडून घे. माझ्या भाऱ्याची किंमत बारा आणे आहे."

दुसऱ्या एकानें बग्गीवरूनच उत्तर दिलें, "तुझाच दिवस आहे बाई आतां! बारा आणेच काय, पण रुपया मागशील तरी जड नाहीं. घेणारे झक्कत घेतील. जरा वकील लोकांना बाहेर पडूं दे..."

हें सारें ऐकतांना गोवर्धनचा राग सारखा वाढत होता. त्याला सारखें वाटत होतें, ह्यांची चांगली खेटरानें पूजा करावी. पाहा कसे

पाहात आहेत तिच्याकडे टक लावून सारेच्या सारे! जसे कांहीं पिऊन टाकतात तिला डोळ्यांनीं...

आणि...!

आणि मुलिया पण हें सारें सहन करते आहे! ती किती खुलली आहे ह्या वेळीं! लाज नाहीं, हिचक नाहीं, तिरस्कार नाहीं! अगदीं मुरकत मुरकत, डोळे मोडीत मुरडीत, डोक्यावरचा पदर उगीचच खालींवर करीत करीत कशी बोलते आहे पाहा! हीच ती मुलिया जी माझ्या आंगावर वाघिणीसारखी धावली होती.

कचेरी सुटली. वकील, पक्षकार, मुखत्यार, ऑफिसर्स, सर्व भराभर बाहेर पडले. कोणी लॉऱ्या पकडल्या, कोणी टांग्यांतून जायला निघाले, कोणाच्या रंगेल नजरा मुलियावर स्थिरावल्या. एकदम ओझें उचलून मुलिया एका बगीमागें धावली. त्या बगींत इंग्रजी तऱ्हेचा पोषाख केलेले एक तरुण वकील बसले होते, त्यांनीं तिचा भारा विकत घेतला; खिशांतून कायसेंसें काढून तिच्या हातावर टाकलें; दोघांत कांहीं तरी बोलणें झालें, ( जें गोवर्धनला ऐकूं आलें नाहीं ). अगदीं हसतमुखानें मुलिया घरीं जायला निघाली. गोवर्धन हें सगळें त्या पानवाल्याच्या दुकानांतून पाहात होता. तेवढ्यांत पानवाल्यानें आपलें दुकान सावरलें, कपडे घातले व दुकानाचें दार लावावयाला तो खालीं उतरला, तेव्हां कोठें गोवर्धन भानावर आला. " काय, दुकान बंद करायचं आहे?"

किंचित् सहानुभूतीच्या स्वरांत तो पानवाला म्हणाला, " ठाकूर-साहेब, ही बिमारी चांगली नाहीं. लवकर औषध घ्या!"

गोवर्धन चकित झाला, " कोणती बिमारी?"

" कोणती बिमारी ? अर्धा तास झाला, तुम्ही पुतळ्यासारखे इथें उभे आहांत. कचेरी रिकामी झाली, सारीं दुकानं बंद झालीं, भंगी लोक झाडून निघून गेले, ह्यांपैकीं कांहीं माहीत आहे का तुम्हांला ? औषध घ्या, चांगलं औषध ! "

महावीरचा टांगा आला आणि गोवर्धन निघाला.

" महावीर, आज किती पैसे कमावलेस ? "

" आज ? आज अगदीं बिगारी सुद्धा टांगा मागितला नाहीं कुणीं ? उलट जवळचे चार पैसे मात्र बिडीबिंडलांत खर्च झाले... "

" हें पाहा, माझी एक गोष्ट ऐक; तूं माझ्याजवळून रोज एक रुपया घेऊन जात जा. मी जेव्हां बोलावीन तेव्हां हजर हो म्हणजे झालं. मग तर तुझ्या बायकोला बाजारांत गवत नेऊन विकावं लागणार नाहीं ? आहे कबूल ? बोल..."

महावीरचे डोळे भरून आले. " मालक, तुमचंच तर अन्न खातों. वाटेल तेव्हां मला बोलवा. तुमच्याजवळून रुपया..."

" नाहीं, मी तुझ्याजवळून बिगार घेऊं इच्छित नाहीं. तूं आजपासून मुलियाला बाजारांत धाडूं नकोस. मी देईन रुपया रोज. तुझी अब्रू तीच माझी अब्रू आहे. आणखी कांहीं पैसाआडका लागला तर बिनदिक्कत माझ्याकडे ये. मात्र एक गोष्ट, मुलियाला ह्यांतला एक शब्द देखील सांगूं नकोस. उपयोग काय ?..."

आणखी कांहीं दिवस निघून गेले; आणि एका संध्याकाळीं मुलियाची व गोवर्धनची भेट झाली. आपल्या आसामीकडून वायदा वसूल करून गोवर्धन घरीं जात होता. ज्या जागीं मुलियाचा त्यानें हात धरला होता त्याच ठिकाणीं त्याला मुलियाच्या हाका ऐकूं आल्या.

" मुलिया, काय काम आहे, सांग ना ? "

मुलिया धापा टाकीत त्याच्याजवळ आली. " पुष्कळ दिवसांची इच्छा होती माझी तुम्हांला भेटायची. तुम्ही दिसलांत म्हणून धावत आलें. आतां मी गवत विकायला बाजारांत जात नाहीं बरं !..."

" फार छान झालं..."

" तुम्ही मला कधीं गवत विकतांना पाह्यलं का ? "

" होय, एक दिवस पाह्यलं होतं. महावीरनें तुला सगळं सांगितलं वाटतं ? मीं तर त्याला मनाई केली होती..."

" तो माझ्याजवळून कधींच कांहीं लपवून ठेवीत नाहीं..."

क्षणभर दोघेंहि स्तब्ध होतीं. काय बोलावें हें कोणालाच सुचेना. मुलियानें हसत हसत सहज म्हटलें, " हीच ती जागा...तुम्ही याच ठिकाणीं माझा हात..."

" मुलिया, तें विसरून जा. त्या वेळीं मी सैतान बनलों होतों..."

" तें कसं विसरूं ? त्याच हाताची लाज आज तुम्ही राखतां आहांत. माणसाला गरिबी कांहींहि करायला लावते. तुम्हीं माझं रक्षण केलंत...."

कोणाच्यानेंच बोलवेना. मुलियाच्या डोळ्यांत पाणी, गोवर्धनच्या मुखावर लज्जा, सौहार्द, कळवळा !

" तुम्हांला वाटलं असेल, मी अगदीं हसण्या मुरडण्यांत दंग होतें..."

" नाहीं, नाहीं मुलिया, क्षणभर देखील असला विचार माझ्या मनांत आला नाहीं...."

“बस्स! एवढंच तुमच्या तोंडून ऐकायचं होतं. एवढीच आशा होती व राहील...”

...भोवतालच्या ओल्या ओल्या बागायतींत वारा विसावा घेत होता. रजनीच्या पोटाशीं बिलगून आपला शीण घालविण्यासाठीं सूर्य भराभर खालीं उतरत होता; आणि त्या धूसर प्रकाशांत क्षणाक्षणानें विलीन होणारी मुलियाची रेखाकृति अनिमिष नेत्रांनीं पाहात गोवर्धन उभा होता.

## । १९ । जंगलची चांदणी ।

तुम्हा सर्वांना हिमालयाचें नांव तर ठाऊकच असेल. जगांत ह्याच्याहून मोठा पर्वत नाहीं. त्याची लांबी हजारों मैल आहे; आणि तो इतका उंच आहे, कीं त्याच्या उत्तुंग शिखरावर अजूनहि कोणी जाऊं शकला नाहीं.

त्या पर्वतराजावर मधून मधून लोकवस्ती आढळते. अलमोडा ही त्यांपैकींच एक होय.

तेथें एक मिय्याजी राहात होते. त्यांचें नांव अब्बूखां. त्यांना बकऱ्यांची फार हौस. नानाप्रकारचीं नांवें त्यांनीं आपल्या बकऱ्यांना दिलीं होतीं. चारपांच बकऱ्या पाळून त्यांना दिवसभर चारण्याफिरण्यांतच त्यांच्या एकट्या मनाला विरंगुळा वाटे. त्यांच्याशीं ते कितीकितीतरी गोष्टी करीत. काय बोलत आणि कसें बोलत कोणास ठाऊक ?

त्यांना सायंकाळीं अब्बूखां बांधून ठेवीत. त्यांचा मुलुख पहाडी आणि म्हणूनच त्या बकऱ्यांची वृत्तीहि पहाडी बनली होती. मिय्याजी गरीब होते आणि दुर्दैवी पण होते. त्यांच्या बकऱ्या त्यांना सोडून कधींना कधीं दावें तोडून पळून जात. त्या बांधोडीनें गुदमरत असाव्यात बहुधा ! जंगलांत एक लांडगा होता. तो त्यांना खाऊन टाकीत असे.

तथापि, मिय्याजींच्या प्रेमाची, सायंकाळच्या खिलाईची आणि त्या लांडग्याची देखील त्यांना पर्वा वाटत नसे हें आश्चर्य नव्हे का ? हीं पहाडी जनावरें आपलें स्वातंत्र्य कोणी कितीहि मोबदला दिला तरीहि गमावीत नाहींत आणि कितीहि संकटें आलीं तरी त्यापासून विचलित होत नाहींत. एका परीनें त्यांचें स्वतःवरच निरतिशय प्रेम असतें हेंच खरें.

अशा भराभर बकऱ्या पळून गेल्या म्हणजे बिचारे अब्बूखां कपाळावर हात मारून घेत. ते मनांत म्हणत ' मीं ह्यांना हिरवं हिरवं गवत खाऊं घालतों, चोरून मारून शेजाऱ्यांच्या भातांच्या शेतांतूनहि ह्यांना सोडून देतों, सायंकाळीं दाणापाणी करतों नि ह्या दुष्ट बकऱ्या मला सोडून पळून जातात नि त्या लांडग्याला आपलें ताजें ऊन रक्त पिऊं देतात !'

असेच एकदा ते त्रस्त झाले, त्रासले आणि उद्वेगून म्हणाले, "आतां बकरी म्हणून पाळणार नाहीं. माझ्या आयुष्याचे आतां उरले तरी किती दिवस ! ते देखील जातील निघून असेच."

पण म्हणतात ना, जित्याची खोड ! त्यांना शेळीवांचून करमेना. एक दिवस त्यांनीं आणली कोठूनशी एक बकरी. ती लहान होती. आतां आतां कोठें पहिल्यांदा व्याली होती. मिय्याजींनीं विचार केला, कीं इतक्या लहानपणीं हिला जर चांगल्या दाण्यापाण्याची सवय लावली तर ती जंगलांत जाणार सुद्धा नाहीं. ही बकरी दिसायला मोठी छान होती. रंग कापसासारखा शुभ्र होता. केस लांब लांब होते. लहान लहान शिंगें होतीं. तिचे लाल लाल डोळे जर तुम्हीं

पाहिले असते तर तुम्ही आपसूक म्हणाला असतां, " अरे, ही बकरी तर आम्हीं सुद्धा घेऊन टाकली असती. "

ती दिसण्यांतच केवळ चांगली नव्हती. स्वभावानें देखील छान होती. मोठ्या प्रेमानें ती आपल्या धन्याचे हात चाटीत असे. तिचें दूध तर अगदीं एवढ्याशा मुलानेंही दोहून घ्यावें. ना कधीं लाथ मारायची, ना कधीं भांडें पाडायची.

मिय्याजी तर तिच्यावर बेहद्द खूष होते. तिचें नांव त्यांनीं चांदणी ठेविलें होतें आणि त्यांचा दिवसाचा सबंध वेळ तिच्याशीं गोष्टी, कहाण्या सांगण्यांत जात होता.

त्यांना असें वाटलें, आपलें आंगण लहान असल्यामुळें ह्या बकऱ्या बुजून पळून जात असाव्यात. त्यांनीं मुद्दाम चांदणीसाठीं दुसरी व्यवस्था केली. घराबाहेर त्यांचें एक शेत होतें. त्याच्या चारी बाजूंना त्यांनीं कोणास ठाऊक कसे आणि कोठून पण खूपसे कांटे जमवून आणले व भोवतालीं पसरून टाकले. आंत चांदणीला बांधलें आणि दोरी खूप लांब ठेविली. तिला त्यामुळें मोकळें फिरतां येत असे.

असल्या ह्या सुंदर थाटामाटांत चांदणी देखील पुष्कळ दिवस त्यांच्या जवळ राहिली. ती इतकी, कीं त्यांना आतां पक्कें वाटलें, कीं ही कसची पळून जाते!

तथापि अब्बूखांची ही समजूत चुकीची होती. स्वातंत्र्याची भूक सहजतेनें शमत नाहीं. दऱ्याखोऱ्यांत राहाणाऱ्या त्या आजाद जनावरांना जर चार भिंतींच्या आवारांत गुदमरत असेल तर कांट्यांच्या कुंपणांतही त्यांना सुख कसें लाभणार? कैद म्हणजे कैद.

थोडे दिवस नव्हाळीनें बरें वाटतें. पुन्हा तीं झाडें झुडपें, जंगलरान आठवतें. कैदी आपली दावण तोडण्याच्या खटपटीस लागतो.

चांदणी रानचा वारा भुलली नव्हती. एक दिवस पहांटे सूर्य टेकडीच्या आड असतांनाच चांदणीची नजर तिकडे गेली. तिचें रवंथ करावयाचें थांबलें. ती पाहात राहिली आणि मनांत म्हणाली,

" ह्या पहाडाचीं शिखरं किती सुंदर दिसतात! तिथली हवा नि इथली हवा! तिथलं तें उनाडणं, कुदणं नि ही सदाची बांधोड! इथें अष्टौप्रहर ही दोरी गळ्यांत! गाढवांनीं हवा तर असल्या जिण्यांत आनंद मानावा. आम्ही तर मुलुखमैदानच्या!"

एवढाच विचार मनांत आला आणि पहिली चांदणी लुप्त झाली व दुसरी चमकली. ना तिला हिरवी हराळी नंतर रुचली, ना पाणी. दिवसेंदिवस ती सुकत चालली. दूध देईना. डोळे सदानकदा पर्वताकडे लागलेले. दोरीला हिसडे देऊन मर्मांतिक आवाजानें बें बें असा आवाज काढून ती ओरडूं लागली. मिय्याजीहि मनांत समजून गेले, कीं कांहीं विशेष आहे. पण विशेष म्हणजे काय ?

एक दिवस दूध काढून झाल्यावर तिनें अब्बूखांकडे तोंड केलें आणि स्वभाषेंत उद्गारली, " मिय्याजी, ह्यापुढें जर मी तुमच्याकडे राह्यलें तर अगदीं नक्की झुरणीस लागेन. मला तुम्ही आतां अरण्यांतच जाऊं द्या."

मिय्याजींना बकऱ्यांची भाषा आतां समजूं लागली होती. ते एकदम विवळून म्हणाले, " हायरे नशिबा, ही देखील जायचं म्हणते." त्यांचा हात थरथर कांपत होता. हातीं असलेलें दुधाचें मृत्तिकापात्र त्यांच्या हातून गळून पडलें आणि चूर चूर झालें. ते जागींच मटकन्

बसले आणि मिनतवारीनें चांदणीला म्हणाले, " बेटा, तूं देखील मला सोडून जातेस ? " तिनें उत्तर दिलें, " होय मिग्याजी, जायची इच्छा तर आहे. "

" कां ? इथला वारा तुला नाहीं आवडत ? कीं दाणा खराब वाटतो ? त्यांत डोळ आहेत का ? मी दुसरा दाणा घेऊन येतों बरं... "

" नव्हे, तसं नव्हे मिग्याजी... "

" तर काय ? दोरी लहान आहे ? आणखी मोठी... "

" पण उपयोग काय तसं करून ?... "

" मग असं तुला पाहिजे तरी काय ?... "

" कांहीं नाहीं. फक्त मला जाऊं द्या... "

" अग पण वेडे, तुला माहीत आहे, तिथें लांडगा राहतो तो ? तो आला तर काय करशील ? "

" देवानें दोन शिंगं दिलीं आहेत. त्यांनीं मारीन... "

" तर काय, केवढी मारणार निघालीस ! त्यानें तर माझ्या कितीतरी बकऱ्या खाऊन टाकल्या. त्यांचीं शिंगं तर तुझ्यापेक्षां कितीतरी पटीनें मोठीं होतीं. तूं कल्लूला पाहिलं नाहींस ? मागल्या वर्षीं ती माझ्याजवळ होती. बकरी कसली, हरीण होतं हरीण ? रात्रभर ती लांडग्याबरोबर लढली. पण अखेर ! पहांटे पहांटे त्यानें तिला नरडी दाबून खाऊन टाकलं. "

चांदणी हें ऐकतांच म्हणाली, " अरेरे बिचारी कल्लू ! पण जाऊं द्या ह्या गोष्टी. मी मात्र जाणार. "

मिग्याजी अगदीं घाबरले, हवालदिल झाले. " देवा, ही सुद्धा त्या लांडग्याच्या तोंडीं जाणार ? नाहीं, हिला मात्र मी वाचवीन नि

चांदणी, मूर्ख पोरी, तुझ्या इच्छेविरुद्ध तुझा बचाव करीन. आतां मला तुझं मनोगत कळलं. तुला ह्या कोठडींत बांधून ठेवतों. तुझा आतां नेम काय ? संधि सापडतांच तूं पळून जाशील......"

अब्बूखांनीं तिला एका कोठडींत बंद केलें आणि बाहेरून कडी घातली !......

परंतु रागाच्या आणि तिरीमिरीच्या भरांत खिडकी मात्र बंद करावयाची ते विसरले.

त्यांनीं ह्या बाजूनें कडी घातली आणि पटकन् तिकडे खिडकींतून उडी मारून चांदणी बाहेर पडली.

इकडे तिकडे चोहिंकडे ! चांदणी पहाडावर पोचली. तिच्या आनंदाला सीमा नव्हती. पर्वतावरील ती रम्य वनश्री तिनें ह्यापूर्वीं कित्येकदा पाहिली होती. परंतु आज तिला तिथली नवलाई अपूर्व वाटली. तिला वाटलें, ' जणूं हीं झाडं आपलं अभिनंदन करीत आहेत.' आजूबाजूला शेवंतीचीं फुलें फुलफुलून हसत होतीं. उंच वाढलेलें गवत तिच्या मानेचें चुंबन घेत होतें. सर्व सृष्टि जणूं आपल्या लाडक्या मुलीच्या परत येण्यामुळें हर्षनिर्भर झाली होती !

आणि चांदणीचें तर विचारूंच नका ! येथें सभोवतीं कांटे नव्हते किंवा खुंटाहि नव्हता. ना दोरी, ना चारा. ती कधीं इकडे उडी मारी, तर कधीं त्या बाजूला उसळून जाई. आतां इकडे, तर क्षणभरानें तेथें खडकावर. कधीं दरींत तर कधीं कपारींत ! पाहा, पाहा, ती घसरली. पण छे ? संभाळली ती. तिच्या एकटीच्या येण्यानें आज सारें जंगल उत्साहउत्फुल्ल झालें होतें; जणूं अबूखां-मियाजीच्या दहा बाराहि बकऱ्या सुटून येथें आल्या आहेत.

एक वेळ तिनें गवतांत तोंड खुपसून वर उचललें आणि तिची नजर अब्बूखांच्या घरावर व कुंपणावर पडली. तिकडे तिनें पाहिलें व ती मनापासून हसली. आपल्याशींच ती म्हणते,

“ कसलं तें मेलं खोपडं. देवा, इतके दिवस मीं तिथेंच राह्यलें का ? कशी राह्यलें मी तिथें ?...”

गोवारी आपल्या बकऱ्या गोठ्यांत बांधण्याकरितां नेत होता. बकऱ्यांच्या गळ्यांतील घंटांचा आवाज होत होता. तो आवाज तिच्या नित्य परिचयाचा होता. तो तिनें ऐकला आणि ती उदास झाली.

अंधार पडूं लागला. जंगलांत कोठूनसा आवाज उमटला... “ खूँ–खूँ–ऽऽ...” तो शब्द ऐकतांच तिला लांडग्याची आठवण झाली. उभ्या दिवसांत चांदणीच्या मनाला तो विचार शिवला नव्हता.

पर्वताच्या खालून शीळ वाजली. शिंगहि वाजलें. शेवटचा प्रयत्न करावा म्हणून बिचारे अब्बूखां येथवर येत होते. आवाज ऐकून चांदणी परतेल, आपल्याकडे येईल ही वेडी फोल आशा !

इकडे मिय्याजी म्हणत होते,“ ये बेटा चांदणी, परत ये ! ” आणि तिकडून त्या क्रूर लांडग्यांचें ओरडणें कानीं येत होतें. तिला वाटलें परतावें नि अब्बूखांजवळ जावें. पण !...

पण तें घर, तो खुंटा, तें कुंपण, सारें तिला आठवलें. ती आपल्याशींच म्हणाली, “तिथल्या जगण्यापेक्षां इथलं मरण पत्करलं !”

झालें ! शिंगाचा आवाज आणि शीळ बंद झाली ! मागच्या बाजूनें पानें फडफडत होतीं. तिनें मान मुरडून पाहिलें. ते दोन कान– अगदीं टवकारून उभे असलेले. ते दोन डोळे – अंधारांत चमकणारे. लांडगा जवळ येऊन पोचला होता.

तो खालीं जमिनीवर बसला. नजर गरीब चांदणीवर रोखली होती. त्याला धीर होता. घाई कसली ? त्याला ठाऊक होतें, ही आतां जाणार कोठें ?

बकरीनें त्याच्याकडे पाहिलें. त्यानें जिभल्या चाटल्या. तो म्हणाला, " ओहो, अब्बूखांची चांदणी ? खाऊन खिलावून ताजी ताजी झाली आहे. " त्याच्या निळ्या ओठांवरून त्याची रक्तासारखी लाल जीभ फिरली.

मिय्याजींनीं कथन केलेली कल्लूची गत आतां चांदणीला आठवली. तिनें विचार केला. उगीचच रात्रभर लढून सकाळीं प्राण देण्यापेक्षां आतांच त्याच्याकडे कां जाऊं नये ? तथापि दुसऱ्याच क्षणाला तिनें तो विचार मनांतून काढून टाकला. डोकें खालीं केलें, शिंगें समोर धरलीं आणि पवित्रा बदलून एकदम ती त्याच्यावर धावली.

धैर्यशीलांची कृति अशीच असते. मात्र असें कोणीं समजूं नये, कीं चांदणीला स्वतःच्या मगदुराची — शक्तीची कल्पना नव्हती; आणि लांडग्याच्या अवकातीचा — सामर्थ्याचा तिनें अंदाज केला नव्हता. तिला हें खचित माहीत होतें, कीं शेळ्या लांडग्याला कधीं मारूं शकत नाहींत. तथापि तिची ही मनापासूनची इच्छा, कीं आपल्यांत जें असेल तेवढ्यानिशींच आलेल्या संकटाला तोंड द्यावें.

जिंकणें किंवा हरणें आपल्या हातचें नाहीं; तें दैवाधीन आहे. झुंज मात्र खेळलीच पाहिजे. मनांत तर असेहि विचार येत होते, कीं " पाहूं तर खरं कल्लूसारखी मी देखील रात्रभर झुंजूं शकतें किंवा नाहीं ! "

कांही वेळ असाच निघून गेला. लांडगा पुढें सरसावला. तिनें देखील शिंगें रोखून असा मारा केला, कीं लांडग्यालाहि कळलें असेल! त्याला तिनें पुष्कळदा मागें हटविलें. सारी रात्र अशीच गेली. मधून मधून आकाशाकडे पाहात डोळ्यांनींच आकाशांतल्या ताऱ्यांना चांदणी खुणवीत होती आणि म्हणत होती, अशीच कधीं सकाळ झाली तर...?

एक एक करितां करितां साऱ्या चांदण्या नाहींशा झाल्या. अखेर तिनें अगदीं शेवटची म्हणून झुंज दिली. लांडगाहि अगदीं त्रस्त झाला होता. इतक्यांत दुरून कोठूनसा प्रकाश दिसला. एका कोंबड्यानें कोठूनशी बांग दिली. खालच्या वस्तींतून मशिदींतील पहांटेचा नमाज ऐकूं आला. चांदणी मनांत उद्गारली, " देवा धन्य आहे तुझी. मी माझ्या कुवतीप्रमाणें झगडलें. आतां मात्र तूंच आहेस! "

मशिदींतील प्रार्थनेचा पहिला जागली अखेरचें 'अल्ला हो अकबर' म्हणत होता आणि तेवढ्यांत चांदणी हांपत जमिनीवर आदळली. तिचें पांढरें स्वच्छ शरीर रक्तानें न्हाऊन निघालें होतें. लांडग्यानें तिला झपटलें आणि खाऊन टाकलें.

झाडांच्या फांद्यांवर बसून चिमण्या हें सर्व पाहात होत्या. त्यांनीं भवति न भवति सुरू केली, कीं अखेर जिंकलें कोण?

त्यांच्यापैकीं पुष्कळशा चिमण्या म्हणतात, " जिंकला लांडगा. "

एक म्हातारी चिमणी आहे. ती म्हणते, " नव्हे मुलींनो, जिंकली चांदणी. "

## ।२०। शै श व स्मृ ति ।

मीं पक्का निश्चय केला होता, कीं मनाच्या पृष्ठभागावर पुन्हा म्हणून ह्या सर्व गोष्टी कधीं येऊं द्यायच्या नाहींत. जीवनाचं हें सबंध भांडं पिऊन टाकायचं आहे. उसंत म्हणून घ्यायची नाहीं !

पण ह्या पराजयाच्या गोष्टीनें माझं मन मात्र कमकुवत कधीं झालं नाहीं. उलट, त्यामुळें मनाला एक प्रकारची विलक्षण हुरहुर वाटते.

त्या वेळीं मी आठनऊ वर्षांचा होतों.आंगभर कपडे घालून, पुस्तकं घेऊन, सालस मुलासारखा शाळेंत जात होतों. हातांतील पुस्तकं केव्हांहि फेकून देण्याची तयारी असल्यामुळें सर्व मुलांचा आवडता होतों नि घरीं तर विचारायलाच नको. मीं पोसलेल्या मनीची देखील राजकन्येपेक्षां जास्त काळजी घेतली जात होती. आजूबाजूच्या दुनियेच्या मानानें माझ्या सुखांत उणेपणा असा कांहींच नव्हता; नि ह्या दर्पपूर्ण जाणिवेनें त्या वेळीं माझा चेहेरा सतत फुललेला राहात असावा असं अजूनहि मला वाटतं; कारण त्याचे कांहीं अवशेष आज तागायत शिल्लक राह्यलेले आहेत !

त्या शैशव–मुग्ध, स्नेह–स्निग्ध बाल्यांतील सर्व स्मृतींचा इथें पुनरुच्चार करीत नाहीं. फक्त दिगंत विजयाच्या माझ्या त्या अवस्थेला कुठून नि कसा आघात पोचला हेंच पाह्यचं आहे.

पण एक प्रश्न आज आणखी मनांत थैमान घालतो. मन विचारतं, 'तूं त्या अनुकूल परिस्थितीचा पुरेपूर फायदा कां घेतला नाहींस ?' खरंच ! मीं माझ्या उन्नतीसाठीं आणखी जास्त झटायला हवं होतं. तथापि, शिकण्यासारखं कांहीं होतं का त्या वातावरणांत ? ह्या प्रश्नाचं आज उत्तर अचूक 'नाहीं' असं येतं नि म्हणून त्या वेळींहि त्या सर्व समृद्धींत सुद्धा माझं मन कशाकरतां तरी सतत भुकेलं असे !

अजूनहि ती वेदना निमाली नाहीं.

त्या दिवशीं शाळेंत जायला घरून तसा मी लवकर निघालों होतों; पण रस्त्यांत संभावितपणा करून एक भांडण मीं आंगावर ओढवून घेतल्यामुळें शाळेंत पोचायला उशीर झाला होता. तहान लागली होती म्हणून शाळेसमोरील नळावर पाणी प्यायला गेलों. फार घाई होती मला नि म्हणून नळावर त्या चिमुरड्या मुलीला सावकाश आंघोळ करतांना पाहून मला फार राग आला. थोड्याशा तोऱ्यांत मीं तिला दरडावलं, "ए मुली, दूर हो. पिऊं दे मला पाणी. ही काय आंघोळ करायची जागा आहे ?"

सुखवस्तु घराण्यांतला मी मुलगा. आंघोळीची जागा रस्त्यावर असते ही माझी कल्पना असणं शक्य नव्हतं. निदान तसं मला समजावून तरी देण्यांत आलं नव्हतं. मीं उच्चारलेलं तें वाक्य ! माझे आजोबा असेच खेंसकत कुणावरहि व हीच देण माझ्यापर्यंत आली होती. ह्यापेक्षां जास्त देण्यासारखं, शिकवण्यासारखं त्यांच्याजवळ होतं तरी काय ? आम्ही कांहींहि म्हटलं तरी 'रस्त्यावर आंघोळ करणाऱ्यांनीं' तें निमुटपणें सहन करावं नि दूर व्हावं हेंच पाहायची आमची सवय !

पण ती राकट मुलगी कांहीं एक मनावर न घेतां जेव्हां अगदीं स्वस्थ आंघोळ करूं लागली तेव्हां माझं मिजासखोर चित्त चिडेला आलं नि मी तिच्या आंगावर धावणार तोंच ती शांतपणें मला म्हणते, “ थांब ना थोडा वेळ, माझी आंघोळ झाली, कीं पी पाणी हवं तेवढं. फारच घाई असेल तर हा नळाचा दांडा ओढून धर म्हणजे मी दोन्ही हातांनीं आंघोळ लवकर आटपत्यें.”

असल्या प्रतिकाराची मला मुळींच सवय नसल्यानें मी थोडा वेळ वरमलों. जातीचं ब्राह्मण्य तसं जिभेवरच होतं. तरी देखील काय करावं हें मला कांहीं वेळ सुचलं नाहीं.

माझ्या भोवतालच्या जगांतली तर ती मुलगी खचित नव्हती. शाळेच्या पटांगणांतच थोडा पलीकडे बलुच्यांचा एक तांडा मुक्कामाला होता. क्षणभर तिकडे नजर टाकली, तरी त्यांच्या राहुट्या नि उमदे घोडे दिसत होते. तिथलीच ती मुलगी होती. हे बलुची कच्चीं वांगीं खातात, लहान गोऱ्यागोमट्या मुलांना पळवतात, असल्या गोष्टी सांगून लहानपणीं मला आईनें भीति दाखवली होती. सबब एकदम तिचा हात धरून तिला दूर लोटण्याची — एरव्हीं धीट असणाऱ्या मलाहि — हिंमत झाली नाहीं. तिची मुद्रा अगदीं बेफिकीर होती. अजूनहि त्या दहा वर्षांच्या चिमुकल्या मुलीचा तो लालबुंद सुंदर मुखडा माझ्या डोळ्यांसमोर दिसतो. बाळपणींचे मनावरील ठसे लवकर पुसले जात नाहींत. मी तिथें तसाच उभा राह्यलों. ती बालिशपणें माझ्याकडे पाहात, हसत हसत, आपलं गोरं, गोरं आंग धूत होती. त्या वेळीं ती माझ्या दृष्टीला कशी दिसली असावी हें इतक्या दिवसानंतर आतां माझ्यानें वर्णन करणं शक्य नाहीं. तथापि

आज लोक जेव्हां माझ्यासमोर ‘ शाकुंतलां ’ तील वनलतेची स्तुति करतात तेव्हां, किंवा एखादी बाणेदार तेजस्वी स्त्री आज अवचट मला दिसते तेव्हां मात्र मला त्या नळावरील मुलीची आठवण येते. वाटतं, ही बाई ह्या मुलीसारखीच बालपणीं कणखर नि चिटुकली असावी. तिच्या आंगावरचं रंगीत जीर्ण वस्त्र माझ्या आठवणींतूनहि फाटून गेलं आहे. तथापि तिचा प्रत्येक खडा बोल मात्र आजहि जसाच्या तसाच आठवतो.

आपली लहानशी तंगडी खरपूस दगडानें घाशीत ती मला विचारते, “ तुझं नांव काय रे ? ”

खरंच सांगतों, त्या वेळीं माझ्या मास्तरांनीं देखील मला असं हडसून खडसून अरेतुरेच्या भाषेंत कधीं विचारलं नव्हतं. मी निमुटपणें माझं नांव तिला सांगितलं. लागलीच ती पुन्हा विचारते, “ तूं शाळेंत काय शिकतोस ? त्या पुस्तकांत काय आहे ? तुला घोड्यावर बसतां येतं ? ”

ह्या दुसऱ्या प्रश्नानंतर थोडा सांवर धरून मी देखील तिला दिमाखानें विचारलं, “ तुला करायच्या काय ह्या पंचायती ? लग्न करणार आहेस का माझ्याशीं ? ”

अर्थात् लग्न बिग्न इत्यादि सगळे शब्द नि असले प्रश्न विचारण्याचा कुलाचार मी घरूनच शिकलों होतों.

तिला मात्र त्या शब्दाचा अर्थ समजला असावा. ती हसली नि डोळे भरून तिनें माझ्याकडे पाह्यलं. मी किती लाजून गोरामोरा झालों होतों हें अजूनहि मला आठवतं नि हसूं येतं. ती मात्र ह्या एकंदर कल्पनेनें खूष झालेली दिसली. ओलेत्यानेंच उठून चटकन् तिनें नळाचा

दांडा ओढून धरला नि म्हणाली, " हं, घे; हा मी दांडा धरून ठेवतें. पी पाणी. "

रस्त्यावरचे नळ आपल्या परिचयाचे आहेत. जोंपर्यंत दांडा ओढून धरला तोंपर्यंतच पाणी येतं नि सोडला कीं पाणी बंद !

मी पाणी प्यालों व कांहीं एक न बोलतां मुकाट्यानें निघालों. पण...

" ए मुला, पळतोस काय ? धरून ठेव ना दांडा जरा. तोंपर्यंत मी केस धुऊन घेत्यें. "

नुसते हुकमी हुकूम !

मी दुखावला गेलों नि तिला चक्क नाहीं म्हणून सांगणार तोंच...तिनें माझा हात धरला. ती आपल्या जातीची नव्हतीच. चढत्या सुरांत मला म्हणते,

" तूं कशाला मदत करशील कुणाला ? तुम्ही हिंदुस्थानी लोक. तुमच्या कायद्यांत थोडंच हें येणारं आहे. हमालासारखं पुस्तकाचं ओझं घेऊन जातोस कशाला शाळेंत ? फेकून दे तीं पुस्तकें. माझा घोडा तरी तुझ्यापेक्षां जास्त शाहाणा आहे. "

आम्ही हिंदुस्थानी लोक ! ही अशी कायदेशीर भाषा मला कुणी कधीं सुनवली नव्हती. मीं पुष्कळ विचार करून पाह्यला. आमचा कायदा तो काय ? पुष्कळांना मीं हा प्रश्न विचारला नि सर्वांनीं मला मूर्खांत काढलं. उत्तर मात्र मला मिळालं नाहीं.

त्यानंतर कितीतरी दिवस तिचा मुक्काम त्या गांवांत होता. तिथें ती असेपर्यंत तिला रोज उंच, धिप्पाड अशा अरबी घोड्यावर नुसते त्याचे केस धरून उघड्या पाठीवरून रपेट मारतांना मीं पाह्यलं होतं. वचकच बसला होता मला तिचा ! कोणत्या शक्तीनें त्या वेळीं तिनें

माझ्यावर अशी सत्ता जमविली कुणास ठाऊक ! पुष्कळदा मला वाटे, तिला थांबवावं नि म्हणावं, " तूं मला विसरूं नकोस. माझी ओळख ठेव. "

आजवर कितीतरी लोकांनीं ' आम्हांला विसरूं नकोस. ' असं मला विनवलं होतं पण मला त्याबद्दल कधीं कांहीं वाटलं नाहीं. आज मी मनोमन तिला आळवीत होतों, " मी दुर्बळच कां असेना; पण मला विसरूं नकोस. मला धिंवसा वाटेल त्यानें ! " पण पुन्हा भीति वाटे. आणखी ती एखादा कायदा काढील नि मला पराभूत करील !

नि तसं झालंहि ! आठ दहा वर्षांनीं पुन्हा ती मला भेटली. गांवांत चाकूकात्र्या विकायला आली होती. भरदार जवानींत पेरूच्या सरस कांतीनं तिचं सर्वांग मुसमुसलं होतं नि तिच्या रंगीबेरंगी कपड्यांतून आपल्या आरोग्याची साक्ष देत होतं. तिचीं पावलं पृथ्वीलाहि जाणवत असत. रानांत स्वैरपणें वाढणाऱ्या नि विपुल सूर्यप्रकाशांत सुरंगलेल्या झाडासारखी तिची सर्वच ठेवण रानवट नि सुंदर होती. कच्चीं वांगीं खाऊन नि घोड्यावर रपेट मारून जर असलं निर्भर सौंदर्य मिळूं शकतं तर आम्हीं वस्त्राभूषणांची नि प्रसाधनांची कांस कां धरावी हें मला अजूनहि समजत नाहीं.

ती आमच्या घरावरून ' चाकू कात्र्या ' ओरडत जात होती. दादा दुपारीं जेवून ओटीवर बसले होते. त्यांनीं तिला हाक मारून चाकू दाखवायला सांगितलं. ती आली. आपलं गवाळं तिनें सोडलं नि एक चाकू दाखवून अवास्तव किंमत सांगायला लागली. दादांना अर्थात् राग आला नि ते मोठ्यानें कांहींतरी बोलले. ती दबणार थोडीच होती ! ती अगदीं तेवढ्याच चढत्या आवाजांत म्हणाली,

" तुम्ही दखनी लोक. कधीं वस्तु पाहिल्या तुम्हीं ? नुसत्या बोलायच्या कामाचे ... ..."

मी आवाज ऐकून बाहेर आलों. चटकन् तिला 'ती' म्हणून ओळखलं. तिनेंहि क्षणभर मला वाटतं आपली दृष्टि माझ्यावर स्थिर केली. ओळखलं असेल तिनें मला ? त्या वेळीं तिनें मला हसतमुखानें डोळे भरून पाह्यलं होतं. ती परत जायला निघाली तेव्हां तिला दाराजवळ मीं गाठलं नि विचारलं, " ओळखतेस मला ? लहान होतीस नि आमच्या शाळेच्या नळावर आंघोळ करीत होतीस." मीं त्या शाळेच्या नळाकडे बोट दाखवलं. ती हसली नि माझ्याकडे पाहून मला म्हणते, " ओळखणार कां नाहीं ? आम्ही एकाद्याला मनांत ठेवतों तें हंमेशासाठीं ठेवतों. विसरत नाहीं. पण इतक्या वर्षांत तूं इतकाच वाढलास ? माझ्याकडे पाहा. मी कशी छान दिसत्यें. आतां तुला एक ठोसा मारीन तर तूं जाऊन पडशील तिकडे. चल, चल. काय इथें राहातोस ? मी तुला घोड्यावर बसायला शिकवत्यें."

हें सगळं अवखळ खरं पण मला मनापासून आवडलं. एका उसळीसरसं असं वाटलं, कीं जावं तिच्याबरोबर नि शिकावं सगळं. मन, शरीर बळकट तरी होईल. मग कुणी आपल्याला ठोसा मारणार नाहीं नि मनालाहि असे धक्के बसायचे नाहींत.

नंतर ती एक दोनदा उगीच चाकू कात्र्यांच्या मिषानें आली होती; पण मी त्या वेळीं घरीं नव्हतों. ह्या आठ दहा वर्षांत जें लाभलं नाहीं तें तिच्या एका निर्भत्सनेनें नि तिच्या आड लपलेल्या सौहार्दानें मिळालं. जाऊं मी तिच्याबरोबर ?......

पण भीति! आईची, दादांची, माझी, माझ्या पुस्तकांची, तिच्या ठोशाची...भितां भितां उभा जन्म गेला. वाडवडलांपासून तीच देणगी मला मिळाली होती. मग त्या मुलीला — मजबूत, धिप्पाड जनावराला घामाघूम करून आणणाऱ्या, आतां मोठ्या झालेल्या, आमच्या जातीच्या नसलेल्या त्या मुलीला — मीं कां भिऊं नये?

जेव्हां जेव्हां हें सगळं आठवतं तेव्हां तो प्रश्न पुनः पुन्हा मनांत थैमान घालतो. माझ्या देशाच्या कायद्यांत दुसऱ्याला मदत करण्याचंहि असूं नये का? नि आपल्या हिताच्या गोष्टी करून टाकतांनाहि मन भीतीनें कचरावं का? ह्या साध्या माणुसकीच्या गोष्टी! पण त्यांसाठीहि इतरांकडून हिडिसफिडिस करवून घेण्याची वेळ यावी!

ह्या माझ्या खोलीभर पुस्तकं पसरलीं आहेत. सर्व वाचून संपवलीं. पण कुठें म्हणतां कुठें प्रकाश दिसत नाहीं. वीरांच्या कथा वाचल्या. शूरांचीं गीतं गायलीं पण अजून माझी खात्री आहे, कीं पुन्हा एक दिवस अवचित ती येऊन उभी राह्यली नि तिनें विचारलं तर तिच्या एकाहि प्रश्नाचं उत्तर मला देतां यायचं नाहीं. सर्व देशाचे कायदे पाह्यले. धर्मापलीच्या घाटाजवळ स्पार्टन लोकांचा स्मृतिलेख आहे. झर्क्सिसबरोबर झुंझून लिओनिडस आपल्या एकूण एक वीरांसहित तिथें मरून गेला. आतां फक्त कांहीं वाक्यंच ह्या सर्व प्रकाराबद्दल इतिहासांत नमूद आहेत...

"हे प्रवासी लोकहो, तुम्ही कधीं ह्या रस्त्यानें स्पार्टाकडे गेलांत तर स्पार्टन लोकांना आमचा असा निरोप सांगा, कीं आमच्या देशाच्या कायद्याला अनुसरून ह्या ठिकाणीं आम्ही आमचे देह ठेविले आहेत."

## प्र स्था न

स्पार्टन लोकांच्या देशाचा कायदा, कीं सगळ्यांनीं लढायचं नि रणभूमीवर सुखेनैव निद्रा घ्यायची !

आणि आमच्या देशाचा... ! खरंच, काय आहे आमच्या देशाचा कायदा ?

स्पार्टन लोकांच्या त्या देशाला जाण्याचं भाग्य लाभलेला प्रत्येक प्रवासी हटकून त्या ठिकाणीं थांबत असेल नि तें स्मृतिचिन्ह पाहून स्वतःला धन्यधन्य समजत असेल.

आजवर पुष्कळ पाह्यलं, अनुभवलं. बछुची लोक, त्यांच्या त्या राहुट्या, ते उमदे घोडे — कितीदा तरी पाह्यलं — नि प्रत्येक वेळीं तिच्या सांगण्याप्रमाणें सगळीं पुस्तकं फेकून देण्याचीच सतत इच्छा मनांत राह्यलेली आहे.

पुन्हा ती भेटेल कधीं मला ? भेटली तर मी खरंच भिणार नाहीं. तिला मी खचित विचारीन. म्हणेन, "मला सांग, तुझ्या त्या उमद्या घोड्यावर बसून तूं किती प्रवास केला आहेस ? नि आमचा देश कितीसा पाह्यला आहेस ?"

ती खात्रीनें उत्तर देईल. कारण तिचा घोडा भरधाव चौफेर उधळीत तिला कुठें नाहीं तरी लिओनिडसच्या देशाकडे खचित खचित घेऊन गेला असावा !...

नागपूर जेल

२३·११·४२

दुपारीं ३ वाजतां

## ।२१। सं घ र्ष ।

तसं पाह्यलं तर त्या जाणिवेनें बरं वाटायला हवं. पण माझा अहंकार जाईल तेव्हां ना ! मला वाटतं, मीं कुसुमला शिकवलं, तर माझेच विचार तिनें बोलून दाखवले पाह्यजेत. साध्या साध्या गोष्टींत तिच्या आधुनिक मनाची मला जी ओळख होते, तेव्हां मी अस्वस्थ झाल्यावांचून राहात नाहीं. कदाचित् सूक्ष्म रीतीनें मी तिचा हेवा देखील करीत असेन. किती निर्भीडपणें ती आपले विचार मांडून दाखवते !

परवां तिला मीं मोरूतात्यांची गोष्ट सांगितली. तिच्यावर देखील तिचं कांहीं मत असेल ह्याची मला स्वप्नांत देखील कल्पना नव्हती. मोरूतात्यांमध्यें न आवडण्यासारखं असं खरोखरीच कांहीं नव्हतं. गांवचे सगळे लोक त्यांना चाहात. कुठेंहि गेले तरी त्यांना दोन पानांचा चांगला विडा मिळत असे. कोणतेंहि काम त्यांच्याकडून करवून घेण्यांत कोणालाहि कधीं संकोच वाटत नसे. ते हवे त्याच्या-साठीं रखडत, खस्ता खात; कधीं त्यांना थकवा आला नाहीं, कधीं दुःखानें कळवळून जातांनाहि कुणीं त्यांना पाह्यलं नाहीं. हर्ष-खेदाचा तीव्रतर उमाळा त्यांच्यांत कधीं नव्हताच, राहाणेंहि शक्य नव्हतं ! घरची गरिबी. पाठी-पोटाशीं चार कच्चींबच्चीं बांधलेलीं. भिक्षुकी

संपुष्टांत आलेली. लोकहि हळूहळू साक्षर होऊं लागले होते. कुणाला वाचून दाखवीन म्हटलं, कोणाची लिखापढी करून निर्वाह करूं म्हटलं तरी दिवसें दिवस तें अशक्य होत होतं.

त्यांची पत्नी कुलीन, सालस होती. ती घरीं धुणीं भांडीं करी, शंभर ठिकाणीं मुलांच्या कपड्यांना ठिगळं लावी. संसार तिनें कधीं उघडा पडूं दिला नाहीं. देवाचा नैवेद्य कोरड्या भाकरीनें कधीं दाखविला नाहीं. मोरूतात्यांच्या वीस वर्षांच्या संसाराला उणेपणा येऊं दिला नाहीं. ती मनमिळाऊ होती. शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या मुली ह्या तिलाहि मुलीसारख्याच वाटत. सर्वांची आई होऊं शकेल इतकी माया तिच्या पोटीं होती.

त्यांच्या घरांत कधीं कुणाला धुसफुस ऐकूं आली नाहीं. कधीं त्यांचीं मुलं शेजाऱ्याकडे खाऊ मागायला गेलीं नाहींत. श्रीमंतांच्या मुलांना खातांना पाहून कधीं टुकलीं नाहींत...!

हेंच तर सगळं मी कुसुमला सांगत होतों. माझं म्हातारं मन तिच्या मनावर असं ठसवून देऊं इच्छीत होतं, कीं ‘ सुख सुख म्हणतात तें ह्याहून वेगळं असं काय आहे ? ’

हा आमच्यासमोर राहाणारा शहरचा मद्रासी. चार पांचशें रुपये महिना मिळवितो, साहेब बनतो, पण सकाळ संध्याकाळ नोकर नि मुलंबाळं ह्यांच्यावर ‘ वेदवाक्यां ’ शिवाय कोणत्याही सामान्य शब्दांचा उपयोग करीत नाहीं नि भूदेवसाक्ष परिणिलेली त्याची जीवनसखी तींच वाक्यं रोज घोकून घरची स्वयंपाकीण नि बागेची माळीण ह्यांचा उद्धार करीत असते. ह्यांचं शिक्षण, ह्यांचा बंगला, ह्यांचे पैसे, अधेले काय सुख देतात ह्यांना ?

तींच मोरूतात्यांचीं मुलं. तीं बापाजवळ हट्ट घेतात. त्याच्या आंगाला बिलगतात. अधेल्या पैशाच्या खाऊचा हव्यास धरतात. खाऊ मिळाला, कीं आनंदतात. मिळाला नाहीं तर कांहीं तरी शक्कल काढून मोरूतात्या त्यांना खूष करतात.

खेड्यांतलीच त्यांची गरिबीची राहाणी नि खेड्यांतलींच त्यांचीं सुखदुःखं ! जनी मराठणीचा मुलगा शिकायला गेला. त्याचं पत्र येतं. मोरूतात्या वाचून देतात नि दुपारच्या जेवणाला तिच्या मळ्यांतून आलेला ताजा भोपळा भाजीला पुरतो. सोनबा कोष्टी तावांत येतो नि मुलीचं ठरलेलं लग्न मोडून टाकतो. मोरूतात्या मुलाकडून मध्यस्थी करतात नि लग्न होतं. महिना पंधरा दिवस तरी मोरूतात्यांकडे गव्हाची पोळी रांधली जाते. सायंकाळीं खाटेवर सतरंजी टाकली, कीं तान्या महाजन, भिका गवळी, जागोबा तेली येऊन बसतात नि पानविडा चालतो. पानं कितीहि वाईट असलीं तरी त्याकडे कुणाचं लक्ष जात नाहीं. जसं दाम तसं काम. टपोर दाणा असला तर ओंजळभर ज्वारीबद्दल मोठीं कोवळीं पानं बारीण काढून देते. बोंडाचे किंवा पेवबुडाचे दाणे तिच्या तरी काय उपयोगाचे ? ती बारीक उंदराच्या कानांएवढीं पानं काढून देते. पण त्या लहान पानांचा विडा देखील तान्या महाजनासारख्या प्रतिष्ठित कास्तकारानें चुकूं दिला नाहीं. ही मोरूतात्यांची पत !

तेच आम्ही ! लोकांना सभ्यतेनें आमंत्रण देतों. शक्तीच्या बाहेर सरबराई करतों. माजघरापर्यंत त्यांना जोडे आणूं देतों. चार दोन कांचभांडीं धांदलींत फुटलीं तरी पर्वा करीत नाहीं. पण शेवटीं जिवानिशीं जाऊनही आमचीं सगळीं पक्वान्नं ‘ वातड ’ ठरतात.

याचं कारण तरी काय ? आमच्याच मुलांची गोष्ट घ्या ना ! त्यांनीं मागितलेली वस्तु ते भोकाड पसरतील ह्या भीतीनें त्यांच्या डोंबलावर घालावी लागते. पण तींच – शिवलेले, ठिगळलेले कपडे घातलेलीं – मोरूतात्यांचीं मुलं !

एकदा केव्हां तरी त्यांनीं तात्यांचा पदर धरला नि दोघे तिघे एकदम म्हणाले, " तात्या, आम्हांला मिठाई. मिठाई आणून द्या आम्हांला. " मिठाई ! तात्यांनीं सगळे खिसे चाचपून पाह्यले. एकहि पैसा कुठें वाजला नाहीं. आतां मुलांना काय रागं भरायचं ? उद्यां आणून देईन म्हणून खोटी समजूत घालायची ? कीं बाजारची मिठाई खाऊन प्रकृति बिघडते असा त्यांना उपदेश करायचा ? तात्या उठले. ' हो ' असं म्हणून बाजारांत गेले. पांच मिनिटांनीं परत आले नि सगळ्यांना मोठ्या विनोदानें, लटक्या लगबगीनें बोलावून एकेकाच्या हातावर त्यांनीं पांढऱ्या खडे मिठाचा एकेक खडा ठेवला नि मोठ्यानें हसून दिलं. आपण बनलों म्हणून मुलंहि खूष झालीं नि तें खारं मीठ गोड झालं. त्या मुलांना नऊ नऊ महिने पोटीं बाळगून शिणलेली त्यांची माउली दारवंठीं उभी होती. तीहि विषण्णतेनें हसली नि खारा प्रसंग साखरेशिवाय गोड झाला !

आहे त्या परिस्थितींत वारा येईल तशी पाठ देऊन अठराविश्वे दारिद्र्यांतहि सुखानें राहाण्याचा हा मोरुतात्यांचा कित्ता ......

तोच तर त्या दिवशीं मीं कुसुमला सांगितला नि अल्पसंतोषाची महति गाइली. खरंच सांगा, काय वावगं सांगितलं होतं मीं ? वरील प्रसंग मीं पाह्यला. ह्यांतलं अक्षरहि खोटं नाहीं. तथापि, ही पुस्तकं वाचलेली मुलगी चिडून मला म्हणते,

" काका, तुमचे मोरूतात्या आजवर सुखानें जगले. ते कदाचित् मरतीलहि सुखानें. मला त्यांचं सुखदुःख कांहीं नाहीं. पण तीं लहान लहान मुलं! तीं माझ्याप्रमाणेंच मोठीं होतील नि त्यांच्या सुखदुःखाची आम्हांला पर्वा करावी लागेल. त्यांना मिठाईबद्दल मीठ देऊन तुम्ही सुखी राह्यला शिकवणार काय? त्यापेक्षां तीं ओरडत ओरडत मेलीं तर फायद्याचंच होईल. असलं वंचित जीवन जगण्यानें लाचारी येते. हवे तसे दिवस काढून मानवतेचा अपमान करीत जगण्याची सवय लागते. देव नि दैव ह्यांवर अवलंबून राहून इथलीं दुःखं सहन करण्याचं लांछन पदरीं बांधतांना खंत वाटत नाहीं. हाच तर आम्हां भारतवासीयांना शाप आहे! मला सांगा, इतकीं सततचीं दुःखं नि अवमानित जीवन पृथ्वीखंडावरील कोणती मानव जात सहन करूं शकली? ना ख्रिस्तांनीं तें सहन केलं, ना बुद्धांनीं. ह्याचं कारण हेंच, कीं असली सवयच त्यांना कुणीं लावली नाहीं; ना देवाच्या नांवावर ना दैवाच्या. "

असंच कांहींसं ती चौथ्या वर्गांत असतांनाहि बोलत असे. भारतीय युद्धाच्या प्रसंगांतील अश्वत्थाम्याच्या बालपणींचं एक चित्र तिला मीं दाखवलं होतं. पीठपाणी पिऊन दूध प्याल्याच्या आनंदानें अश्वत्थामा नाचत होता नि त्याची आई नि गुरु द्रोणाचार्य भिजलेल्या डोळ्यांनीं त्याचा तो आनंद पाहात होते. हें चित्र पाहून तेवढ्या लहानपणीं देखील तिच्या डोळ्यांत पाणी आलं होतं. ती म्हणाली होती, " उगीच फसवलं बिचाऱ्याला! "

कुसुम म्हणते तें चांगलं कीं वाईट ह्याचा निर्णय लवकरच लागायचा आहे. आमच्या पिढीच्या लोकांनीं आहे त्यांत समाधान

मानणारे मोरूताल्या पुजले. पण ही कुसुमची तरुण, ताज्या, गरम रक्ताची पिढी त्यांच्या मुलांना नि मोरूताल्यांना पण, असेल नसेल तेवढं बळ एकत्र करून ओरडायला सांगते, "छे, छे! हें खोटं, खोटं सुख आम्ही मुळींच मानणार नाहीं नि असे पीठपाण्यानें फसविले पण जाणार नाहीं. ओरडूं, आमची दाद लागेपर्यंत ओरडूं ..."

कोण विजयी होणार कुणास ठाऊक? नियतीनें पेट्यांचे रंग निश्चित करून टाकले आहेत. उभी मानवजात आपल्या जीविताचं चिटोरें आपल्या मताप्रमाणें त्या पेट्यांतून भराभर टाकीत आहे. लवकरच पेट्या उघडल्या जातील !

पाह्यचं, कुसुम जिंकते कीं आम्ही !

केवळ तिच्याबद्दलच्या वात्सल्यानेंच नव्हे, तर अगदीं मनापासून मी सांगूं इच्छितों, कीं ह्या मतमोजणींत जर मी हरलों तर सुखी होईन किंवा नाहीं कुणास ठाऊक, पण वाईट मात्र खचित वाटून घेणार नाहीं.

पेट्या उघडेपर्यंत वाट पाहावी आतां !

नागपूर जेल
२१.१२.४३

## ।२२। अ भि शा प ।

तो असं नेहमींच करी. तें त्यानें सांगितलं तेव्हां मी देखील त्याच्याबरोबर हसलों. करमणुकीचाच तो एक प्रकार होता. पण हसलों तरी मनाला चुकचुक वाटल्यावांचून राह्यली नाहीं. माझ्या नीतिकल्पना दुखावल्या म्हणून नव्हे; समाजाचं हित बाधेल म्हणूनहि नव्हे. एकाच गोष्टीची खंत वाटली. कावीळ झाली म्हणजे सगळंच पिवळं दिसतं नि सगळं पिवळं दिसायला लागलं म्हणजे कावीळ झाली असंहि अनुमान काढायला हरकत नाहीं. डोळयाच्या बाहुल्या उलट्या लागाव्या नि सरळ गोष्टीहि उलट्या दिसाव्या. भरल्या आयुष्याला शाप लागावा नि त्यांतून सगळंच पापमय दिसावं !

असंच कांहींसं वाटलं म्हणूनच ही चुकचुक. त्याचं चुकतं कीं माझं कुणास ठाऊक ?

तो अगदीं तरुण आहे. परिस्थिति त्याला अनुकूल आहे. कॉलेजच्या थर्ड ईयरमध्यें तो शिकतो आहे. हवी तशी वापरायला त्याच्याजवळ एक सायकल आहे. ती पुसून चक्क ठेवायला त्याच्याजवळ नोकर आहेत. बराचसा वेळ अवांतर घालवून अभ्यासाची हानि होणार नाहीं इतकी त्याच्याजवळ बुद्धिमत्ता आहे. कुणी आदर्शाच्या,

ध्येयाच्या गोष्टी त्याच्यापुढें करायला लागला तर त्यांकडे दुर्लक्ष करण्याइतकी बेदखलीहि आहे.

नि अशा वृत्तींत तो जें आजवर करीत आला तें अपेक्षेपेक्षांहि साधं आहे असं मला स्वतःलाहि म्हणायचं आहे. पण...पण आतां तो प्रकारच सांगतों म्हणजे झालं.

तो म्हणाला, ''काल मी दुपारीं साडे तीनला कॉलेजमधून परतलों. मन कसं ओकं ओकं वाटत होतं नि असंच मला बरेचदा वाटतं. इतर ख्यालीखुशालीची माझ्यांत हिंमत नाहीं. घरीं आई, वडील आहेत; लग्नाच्या बहिणी आहेत. त्यांच्या मनांत माझ्याबद्दल जिव्हाळाहि आहे. म्हणून मी असंच करतों जें काल केलं.

'' सरळ धन्तोलीवर निघालों. तिथें सुंदर सुंदर बंगले आहेत. बंगल्यांच्या समोर सुंदर बागा आहेत. त्यांत सुंदर फुलं आहेत. बंगल्यांना शोभा येईल इतकी फुलझाडांची रचना सुव्यवस्थित आहे. एखाद्या सडकेनें जरी गेलं नि बंगल्यांकडे नजर टाकली तरी बरं वाटतं. बंगल्यांच्या खिडक्या मोठ्या आहेत. खिडक्यांना रंगीत पडदे आहेत. दारांना कलाकुसर केलेले झिरझिरीत पडदेहि आहेत.

'' त्या बंगल्यांतून बरेचसे सरकारी नोकर राहातात. सगळे दुपारचे ऑफिसांत जातात. त्यांच्या घरच्या मंडळींना वेळहि भरपूर असतो. सुखहि भरपूर असतं. काम करायला नोकर चाकर असतात नि सबंध दुपारचा वेळ घालवायचं तेवढं एकच काम त्यांच्याकडे असतं. एखाद्या रुमालावर कशिदा काढीत किंवा एखाद्या गवसणीवर फूल काढीत त्या व्हरांड्यांत येऊन बसतात. कामचं काम व्हावं, सडकेकडे

पाहून वेळहि जावा हा उद्देश ! कुंडींतल्या झाडांसारख्या तितपतच सजीव, नीटनेटक्या नि व्यवस्थित अशा त्या दिसतात. त्यांच्याकडे पाह्यल्यास बरं वाटतं. एखादा दुसरा शब्द जर बोलायला मिळाला तर आणखी छान वाटतं !

“ पण सगळयांशीं माझी ओळख नाहीं. ओळखींत मजाहि नाहीं. उलट जबाबदारी वाढते. ओळख नसतांना बोलण्यांतच मजा आहे.

“ काल असाच एका बंगल्यासमोरून गेलों. असंच एक कुंडींतलं झाड एका निळया कोचावर बसलं होतं कसलं तरी कलाकुसरीचं काम करीत. अगदीं तरुण, अगदीं नवं, नुकतंच कळ्याफुलांवर आलेलं. पाहावंसं वाटलं, बोलावंसं वाटलं. सायकलवरून खालीं उतरलों.

“ मला माहीत होतं, पक्कं माहीत होतं, कीं ह्या बंगल्यांत अमके अमके राहातात. अमूक ऑफिसांत ते नोकर आहेत. परंतु ह्या ज्ञानानें काम होण्यासारखं नव्हतं. अज्ञानानेंच आनंद वाटणार होता. शाहाणपण कामांत पडणार नव्हतं.

“ सरळ फाटक उघडून आंत गेलों. नमस्कार केला. थोडासा हसलों. नम्रपणें विचारलं, ‘ का हो, दातार इथेंच राहातात ना ?’ दातार तिथें राहात नव्हते. दातारांचा बंगला मला माहीत होता. त्यांचा परिचयहि होता. पण...

“ मला उत्तर मिळालं, ‘ छे, दातार इथें राहात नाहींत. आपली दिशाभूल झालेली दिसते. कुणीं तरी चुकीनें सांगितलेलं दिसतं. ’

“ मीं विचारलं, ‘ पूर्वीं कधीं राहात होते का इथें ? मला जरुरीचं काम आहे. जरुरीचा निरोप त्यांच्या घरीं कळवायचा आहे. मला

पत्ताच कुणीं तरी चुकीचा सांगितला. आपल्याला माहीत आहे त्यांचं घर ? सांगाल तर फार उपकार होतील.'

"एक मंद स्मित — जें मला हवं होतं — नि 'इश्श ! उपकार कसले त्यांत. इथून जवळच आहे कीं त्यांचा बंगला. इथून दिसतो तो तिसरा बंगला नि डावीकडचं तें त्यांचंच घर.'

'कोणता ? तो निळा काय ?'

'अं हं. त्या बाजूला डावीकडे. त्या निळ्याच्या तिथूनच वळायचं. असे सरळ जा.'

"आतां जावं लागणार. जावंसं वाटेना. उगीच थांबलों. घुटमळलों. असहाय चेहेरा केला नि हसून दिलं.

'चला. मीच रस्त्यावरून दाखवून देत्यें.'

" हातचं वीणकाम ठेवलं गेलं. पदर नीट केला गेला.

" नाजूक हालचाल झाली. हातांच्या बिलवरांचा आवाज झाला नि दोघेंहि फाटकाच्या बाहेर आलों.

'तो पाहा. तोच बंगला. तो सायकलवाला दिसतो आहे ना, तो त्यांच्या बंगल्यासमोरच आहे.'

'बरं आहे, नमस्कार. त्रास दिला आपल्याला, माफ करा.'

'कसचं कसचं ! बराय् नमस्कार.'

" मी निघालों. फाटक लोटून घेतल्याचा आवाज झाला. कुठले दातार नि कुठला निरोप. सरळ घरीं आलों. बरं वाटलं. तेवढीच मौज. सुंदर दृश्य. चार दोन शब्द बोलायला मिळाले हा केवढा फायदा. उभयपक्षीं नुकसान कुणालाच नाहीं. असंच.कांहीं कांहीं करुनी..."

हें असं त्यानें सांगितलं. मीं ऐकूनहि घेतलं. पाठीवर थाप मारली त्याच्या. त्याला थोडा गर्वहि वाटला, त्यानें जी अक्कल लढवली त्याबद्दल.

त्याला ह्यांत मौज वाटली. मला मौज वाटली नाहीं असं नाहीं. मला वावगं वाटलं तें फक्त त्यानें सांगितलेल्या पदर सावरण्यांत, नाजुकशा गोड हालचालींत, बिलवरांच्या मंजुळ आवाजांत! एरव्हीं परस्परांनीं परस्परांना मदत केली ह्यांत करमणूक होण्यासारखं पुष्कळच असतं. तें सगळं सुंदर होतं ह्याबद्दल कुणीच वाद घालणार नाहीं. पण त्यानें तें कुंडींतलं झाड अर्धंच पाह्यलं. पूर्ण पाह्यलं नाहीं. जी शक्ति त्या झाडांना जगवते, नि सुंदर दिसायला लावते ती शक्तीच त्यानें पाह्यली नाहीं. वास्तविक काय गरज होती त्या बाईला, कीं तिनें आपल्या जागेवरून उठावं नि हा वाट चुकूं नये म्हणून मोठ्या आनंदानें ह्याला रस्ता दाखवावा? ती कांहीं ह्याच्यासारखी ओकं ओकं, रिकामं रिकामं वाटून घेण्याच्या परिस्थितींत नव्हती. पण कुणीहि चुकत असलं तर त्याला बरोबर करावं, पडत असलं तर त्याला उचलून घ्यावं, बुडत असलं तर त्याला वर काढावं हा जो मानवाचा धर्म, जो तिला, त्याला नि पर्यायानें सर्व समाजाला पोसतो, त्या धर्माचं एक साधं तत्त्व तिथें त्याच्या प्रत्ययाला आलं नि तेंच नेमकं त्यानें पाह्यलं नाहीं. इतकंच नव्हे तर पाहाण्याचीहि तयारी दाखवली नाहीं. सर्व दिसावं नि ही माणुसकीच पाह्यला त्याचे डोळे असमर्थ ठरावेत ह्यालाच शाप म्हटलं पाह्यजे. संपूर्ण जीवनाची मधुर प्याली प्यायला घेतांना केवळ वरच्या नक्षीकडेच नि धातूकडेच पाहाण्याचा हा करंटेपणा — हा अभिशाप कुणीं दिला कुणास ठाऊक!

ज्या जीवनदेवतेशीं प्रतारणा करून खोटं, खोटं जगण्याचा आव आणला तिनें तर चिडून तो दिला नसेल ?

वर्धा
२२.१२.४२
रात्रीं दहा वाजतां

## ।२३। विसर्जन

ज्या बागेचें कोणालाहि समर्पक वर्णन करतां यायचें नाहीं अशा एका सुंदर उपवनांत पश्चिमेच्या टोकाला खूपशीं फुलझाडें लाविलीं होतीं. त्या झाडांवर सोन्यासारखीं उज्ज्वल रंगाचीं व दुधासारख्या निर्मल कांतीचीं फुलें रोज सकाळीं उगवत आणि सायंकाळीं गळून पडत.

त्यांच्या सुगंधाला सीमा नव्हती. त्यांना दिव्य म्हणून संबोधिलें तर जें कधीं 'डोळिया' देखिलें नाहीं त्याची उपमा दिल्याचा वृथारोप पदरीं यावयाचा. तेव्हां एवढेंच सांगावयाचें, कीं तीं फुलें अनुपम होतीं.

त्यांच्या आयुष्याची मर्यादा एवढीच होती, कीं जोंवर त्यांच्या शरिराची पाकळी नि पाकळी व पराग नि पराग गळून पडत नाहीं. पण त्या क्षणिक, भंगुर, मोजक्या अस्तित्वांत देखील त्यांनीं सृष्टीला धन्य करून डुलविलें होतें. असें वाटायचें, कीं त्यांच्या मुखानें अज्ञात किन्नर मुग्ध गूढ संगीत गात आहेत.

त्या उद्यानांतील एका मोगरीवर सुंदर कळ्या होत्या. त्यांचें सौंदर्य इतकें उज्ज्वल होतें, कीं त्यांच्यापुढें चांदण्या देखील वरमून गेल्या आणि ढगाआड लपल्या! सदैव हास्य हाच ज्यांच्या

मुखाचा विलास अशा निष्पाप बालकांचे दूध–दांत देखील त्यांच्यापुढें निष्प्रभ ठरले !

एका रात्रींत त्या कळ्यांचीं फुलें झालीं. पहांटे फुलें तोडायला बागवान आला. त्याचें त्या फुलांकडे लक्ष वेधलें. त्याला आपल्या श्रमांचें चीज झाल्यासारखें वाटलें. तो आनंदला, हसला आणि त्या उन्मादांत त्यांतल्या एका फुलाशीं बोलूं लागला. तो म्हणाला, " सोनुल्या, तुझं लावण्य खुडून घेण्यास कोण धजेल ? तुझी इच्छा मला सांग. मी ती पूर्ण करीन. "

आपल्या माणसांशीं फुलें बोलतात, हसतात, रडतात ! शकुंतला त्यांना सोडून गेली तेव्हां नाहीं का त्यांनीं आक्रोश केला ? एवढ्या मोठ्या शब्दसृष्टीच्या ईश्वरानें जें लिहून ठेवलें तें खोटें थोडेंच मानावयाचें आहे ?

त्या फुलानें उत्तर दिलें, " बाबा, तुम्हीं तर माझं संगोपनच केलं. माझ्या कसल्या आल्या आहेत इच्छा ! सम्राटांच्या मुगुटावर चढून आपल्या भाग्याचे देव्हारे थोडेच माजवायचे आहेत मला ? रूपसुंदर, मृदुमुखी तरुणींच्या गळ्यांत रुळून माझा काय लाभ ? नि इथें सुकून मरून जाण्यांतहि काय अर्थ ? उगीच मरायचं नि... "

फुलापानांच्या किती तरी गोष्टी आजवर ऐकल्या आहेत. पण हें कसलें फूल ? आणि हें काय त्याचें बोलणें ? तो फुलमाळी विस्मयानें स्तिमित झाला असल्यास नवल कसलें ?

तें फूल पुढें बोलूं लागलें, " असं करा बाबा, मला आपल्या हातानें खुडून इथेंच खालीं टाकून द्या...त्यांची तरी पूजा कुणीं बांधायची ? "

# वि स र्ज न

आतां तर बागवानाच्या आश्चर्याला पार राहिला नाहीं. त्याच्या मनांत असंख्य विचार आले. रात्रंदिवस कष्ट करून खतपाणी केलेल्या त्या पुण्यभूमीकडे त्यानें अशा दृष्टीनें पाहिलें, कीं जणूं...

जणूं ती एक युद्धभूमि होती, जी आपल्या चिरंतन झोपेंतून एकदाच जागी झाली होती आणि केवळ एकदाच तिनें असहाय हुंदका दिला व रक्त ओकून पुन्हा निपचित पडली होती !...

जणूं त्या धर्मक्षेत्रावरच ती बाग सजली होती. त्या फुलझाडांना त्यांच्या रक्तामांसाचें खत मिळालें होतें, ज्यांच्या पराक्रमाची नोंद ठेवायला इतिहासाला फुरसत मिळाली नाहीं, परंतु ज्यांच्या रणकंदनानेंच त्यांच्या मायभूमीनें आपली चिरकालाची तहान अत्यल्प कां होईना पण शमविली आणि जे शेवटीं श्रांतविकल होऊन तिच्याच कुशींत तिच्याच बरोबर झोपून गेले.

आणि त्या महाभागांची पूजा बांधण्याची त्या फुलांनीं अभीप्सा धरली होती जणूं !

वर्धा

१६.७.३६

वाढदिवस तेविसावा

सकाळीं ५ वाजतां

## श्री. वामन चोरघडे ह्यांचीं पुस्तकें



### ल लि त

१. सुषमा (लघुकथा संग्रह)
२. हवन ( ,, )
३. यौवन ( ,, )
४. प्रस्थान ( ,, )
५. चंपाराणी ( लोककथा )
६. प्रभावती ( लोककथा )



### इ त र

१. साहित्याचें मूलधन (लोकसाहित्य-चर्चा)
२. मराठी-हिंदुस्तानी कोश



### अ नु वा द व सं पा द न

१. आमच्या देशाचें दर्शन
२. लाटांचें तांडव
३. भक्तिकुसुमें
४. माझें घर
५. अहिंसेची साधना
६. गांधीजींची अर्थयोजना

